# थोरांच्या माता

लेखक

प्रल्हाद नरहर जोशी;
एम्. ए.; एम्. एड्.

मूल्य रु. १-९-०

व्हीनस बुक स्टॉल पुणें २.

# माझें मनोगत

'थोरांच्या माता' या छोट्या पुस्तकांत कांहीं थोर पुरुषांच्या मातांची चरित्रें थोडक्यांत लिहिण्याचा प्रयत्न केलेला आहे. जगांत श्रेष्ठत्व मिळविणाऱ्या थोर पुरुषांची अनेक चरित्रें प्रसिद्ध होतात. त्यांचा योग्य तो गौरवहि आपण करीत असतों. परंतु या सर्व थोराना थोरवी प्राप्त होण्यासाठी त्यांच्या आईची जी मदत झालेली असते त्याकडे आपलें लक्ष जावें तितकें गेलेलें नसतें. 'आई' या शब्दाची मोहिनी आजवर अनेक कवींना पडलेली आहे. जगांतील सर्व देशांत आणि सर्व भाषांत आईच्या प्रेमावर अनेक सुंदर सुदर काव्यें निर्माण झाली आहेत. 'आई' हा शब्दच सर्वांना चैतन्यदायी वाटतो. पुत्रासाठी तिनें केलेला त्याग, तो मोठा व्हावा म्हणून तिनें सहन केलेले कष्ट, पुत्रासाठी तिच्या चित्तांत सदैव चालणारी उलघाल या आणि अशा अनेक प्रसगाची सरस वर्णनें सर्वत्र सांपडण्यासारखी आहेत. कदाचित् हेंहि खरें असेल की, जगांतील काव्याचा उगमच मुळी मुलाला झोपविण्यासाठी आईनें गाईलेल्या अगाई गीतांतून असेल.

जगांतील थोर पुरुषांची चरित्रें वाचतांना हें चटकन ध्यानांत येतें कीं, त्यांच्या आईची कर्तबगारी कांही विशेष प्रकारची असली पाहिजे. मुलांच्या चारित्र्यघडणांत आईचा वाटा फार मोठा असतो. आई आपल्या मुलांना न्हाऊंमाखूं घालीत असते, नीट कपडे करीत असते, जेवूं घालीत असते, खेळवीत असते, झोपवीत असते, या सर्व प्रसंगी हा माझा बाळ खूपखूप मोठा व्हावा हीच इच्छा तिच्या मनांत दृढ झालेली असते; आणि याच दृष्टीनें तिचे प्रयत्न चालूं असतात. मोरोपंतांनी म्हटलें आहे;

" स्तन पाजितां निजवितां, खेळवितां बालकासी हालवितां ।
दे बोध जो सुदुर्लभ थोरासी सहस्रकल्प मेळवितां ॥ "

आईच्या सहवासांतच मुलांचें खरें शिक्षण सुरू होतें या प्रसिद्ध सूत्रास आजच्या शिक्षणशास्त्रांतहि मान्यता आहे. 'पितृतोऽपि गुरुर्माता नास्ति मातृसमो गुरुः' या संस्कृत वचनांतहि हेंच तत्त्व स्पष्टपणें सांगितलें आहे. मूल जन्माला येण्यापूर्वीपासूनच माता मुलाला शिक्षण देण्याचें कार्य करीत असते. मुलाचा सर्वांगीण विकास व्हावा म्हणून प्रथमपासूनच तिला अनेक

पथ्यें पाळावीं लागतात. आपणांकडे 'डोहाळे' म्हणजे गर्भवती स्त्रीच्या मनांतील इच्छा वर्णन करण्याची चाल आहे. या इच्छा ज्याप्रमाणें असतील तसें मूल तिला होईल असा एक संकेत आहे. यालाहि फार मोठा अर्थ आहे. गर्भात वाढणारा जीव आईच्या बोलण्याचालण्यांतून, हसण्या-खेळण्यांतून प्रगट होत असतो. चेहऱ्यावरचें गांभीर्य, प्रसन्नता, उल्हास याहि गोष्टी होणाऱ्या मुलाच्या कर्तृत्वाची साक्ष देत असतात. या पुस्तकांत आपल्याकडील श्री शिवरायांची आई जिजाबाई आणि श्रीसमर्थमाता राणूबाई या दोघीचे डोहाळे मुद्दाम दिले आहेत.

अनुवंश शास्त्राच्या दृष्टीनें माता नेमकें मुलाला काय देते या तात्त्विक विचारांत लक्ष न घालतांहि आईनें मुलांवर केलेल्या संस्कारांना व तिच्या स्वतःच्या वर्तनाला फार महत्त्व आहे ही गोष्ट सहज लक्षांत येण्यासारखी आहे. मातेचा श्वासोच्छ्वासहि मुलाच्या विकासास उपयोगी पडतो. तिच्या दुधांत मुलाच्या साऱ्या सामर्थ्याचें मूळ असतें. कधी कधीं आपल्या यथार्थ दुधाचा अभिमान एखाद्या थोर मातेला वाटत असतो. याचें एक चांगलें उदाहरण देण्यासारखें आहे. समर्थ रामदासांनीं अंजनीगीत नांवाचें एक सरस काव्य लिहिलें आहे. रावणाचा वध केल्यानंतर राम-लक्ष्मण आणि सीता परत अयोध्येस येण्यास निघाले, मध्यें वाटेंत त्यांनीं हनुमंताची आई अंजनी हिची भेट घेतली. रामरायांनीं तिला नमस्कार करून उद्‌गार काढले, " माते, तुझा पुत्र धन्य आहे. या मारुतीनें आम्हांवर फारच उपकार केला आहे. यानेंच सीतेचा शोध लावला, लक्ष्मणासाठीं द्रोणागिरी उचलून आणला, लंका जाळून टाकली." माते, तुझ्या उदरी जाण । हनुमान जन्मला रत्न । एवढें माझें रामायण । याचेनि योगें ".

पुत्राची येवढी स्तुति रामरायाकडून ऐकल्याबरोबर अजनी माता हनुमंतास तुच्छच गणूं लागली. आणि याचें कारण काय ? तीच रामचंद्राला सांगते; " व्यर्थ कां बा रघुपती । वाहसी भार हा।। कां हा माझ्या उदरीं आला। गर्भीहूनी नाहीं गळला। आपण असतां कष्टवीला । श्रीराम माझा."
हनुमंत स्वतः हजर असतां रावणाचा वध करण्याचें काम रामास करावें लागलें ही गोष्ट अंजनी मातेस सहन झाली नाहीं. ती आपल्या दुधाचें सामर्थ्य रामरायास सांगूं लागली; " माझ्या दुग्धाची हे प्रौढी। कळि-

काळाची नरडी मुरडी । रावणादिक हीं बापुडी । घुंगुरडीं येथें " आणि रामरायाला कदाचित् हें बोलणें पटणार नाहीं म्हणून तिनें " दुग्धधारा सोडियली । शैल उदरीं खेंचविली । त्रिखंडी तेव्हां ॥ वेणीदंड परिताळिला । लंकेसी वेढा दिला । आणुनि रामासि दाखविला । अजनी मातें."

अंजनी मातेच्या दुधाचें सामर्थ्य फार उत्कृष्टपणें समर्थांनी या ठिकाणीं वर्णन केलें आहे. आपल्या मुलाच्या कर्तृत्वाची स्वप्नेंहि आईस पडत असतात. ध्यानी वसे तें स्वप्नी दिसें, असें आपण म्हणतों. मुलगा खूप मोठा व्हावा ही आईची सतत इच्छा असते, हाच तिचा नेहमी ध्यास असतो. आणि याचीच स्वप्नेंहि तिला पडत असतात. जॉर्ज वॉशिंग्टनच्या आईचें स्वप्न पुस्तकांत मुद्दाम थोड्या विस्तारानें दिलें आहे. विमानविद्येंत ग्लेन मार्टिनचें नांव प्रसिद्ध आहे. त्याच्या आईसहि असेंच स्वप्न पडलेलें होतें. १८८६ च्या पधरा जानेवारीच्या रात्रीं स्वप्नांत मिंटा मार्टिन मॅक्सबर्ग शहरावरून स्वतः घरी तयार केलेल्या यत्रांतून आकाशांत भ्रमण करीत होती ! आणि यानतर दोन दिवसांनी ती प्रसूत झाली; पुढें विमानविद्येंत नांव कमावणारा ग्लेन मार्टिनचा जन्म झाला ! अशी उदाहरणें पुष्कळ देतां येतील.

अर्थात् या प्रकारच्या डोहाळ्यांवरून किंवा स्वप्नांवरून शास्त्रीय सिद्धान्त कधीहि बांधतां येणार नाहीत. अनेक स्वप्नें खोटी ठरलेली आपण पहातोंच. अनेक बलवत्तर इच्छा जशाच्या तशाच विरून गेलेल्याहि आढळतात. इतकेंच काय पण श्रेष्ठ आईची मुलें हमखास श्रेष्ठ निघतीलच असेंहि आग्रहानें म्हणतां येणार नाही. आई लहानपणीच मरण पावली असतां किंवा ती अगदी सामान्य दर्जाची असतांनासुद्धां मुलगा अद्वितीय पराक्रमी निघाल्याची उदाहरणेंहि शोध करूं जातां सांपडण्यासारखी आहेत. परंतु सर्वसामान्य दृष्टीनें हेंच खरें मानावें लागतें की जाणती आणि सुबुद्ध आई आपल्या मुलाचें भवितव्य घडवूं शकते. श्रीशिवराय, नेपोलियन, जॉर्ज वॉशिंग्टन, थॉमस एडिसन यांच्या मातांची चरित्रें या दृष्टीनें अभ्यासण्यासारखी आहेत. अनुभवाचा आणि शिक्षणाचा फारच मोठा वारसा या थोर पुरुषांना त्यांच्या मातांकडून प्राप्त झालेला दिसतो. मुलांच्या कर्तृत्वाचा उगम त्यांच्या मातांच्या शिकवणुकीत सहज सांपडण्यासारखा असतो.

A kiss from my mother made me a painter" असें बेंजामिन वेस्ट या विख्यात चित्रकारानें म्हटलें आहे. आपल्या परिश्रमास सुंदर फळ प्राप्त झालें आहे, मुलगा लौकिकवान् झालेला आहे, हें पाहून मातेस धन्यता वाटते. आणि आपल्या आईच्या पाठबळामुळें आपण एवढ्या मोठ्या योग्यतेस पोंचलों याची जाणीव मुलास असते. अशाच कांही मातांची चरित्रें येथें वर्णन केलेली आहेत.

आपला भारत देश अध्यात्मप्रवण म्हणून गौरविला जातो. भोगापेक्षां त्याग आपण महत्त्वाचा मानतों. या दृष्टीने श्रीशंकराचार्य आणि श्रीसमर्थ रामदास याच्या मातांची चरित्रें वाचण्यासारखी आहेत. दोघांनीहि जगाच्या कल्याणासाठीं स्वतःचा संसार मांडला नाही. एकाने संन्यासधर्माची महती सांगितली, दुसऱ्यानें राष्ट्रधर्म विस्तारून सांगितला; दोघेहि मातृभक्त होते. दोघांच्याहि मातांच्या जीवनात एकच प्रश्न महत्त्वाचा झालेला दिसतो. मुलानें चांगल्याप्रकारें संसार करावा, घरात मुलेलेकरें रांगू लागावीत असेंच दोनहि मातांना वाटत होतें. आर्याम्बा आणि राणूबाई यांना मुलांचें वैराग्य प्रथम तरी विचित्र वाटले. मुलाच्या लग्नाचा प्रयत्न दोघींनीहि केला. परंतु दोघींनाहि यश आलें नाहीं. विश्वाचा संसार करण्याचें कार्य मुलानें पत्करलेलें पाहून पुढें दोघींनाहि धन्यता वाटली. परंतु मुलानें लौकिक संसार करावा ही तीव्र इच्छा आईस असणे अत्यंत स्वाभाविक आहे. आधुनिक कालांतील एक उदाहरण येथें अपवाद म्हणून देण्यासारखें आहे.

भूदानयज्ञाच्या चळवळीमुळें जगांत प्रसिद्धीस आलेले आचार्य विनोबा भावे यांची मातृभक्ति प्रसिद्ध आहे. मराठीत नावारूपास चढलेली त्यांची 'गीताई' त्यांनी आपल्या आईसाठींच प्रसिद्ध केली आहे "आई, गीता व तकली" या त्रयीवर या महात्म्याचे जीवन उभारलेलें आहे. विनोबा बालपणापासूनच विरक्त होते. संसार करावा हें यांच्या ध्यानात चुकूनसुद्धां आलें नाही. आणि नवलाची गोष्ट की त्याच्या आईनेंहि त्यांना कधी तसा आग्रह केला नाही. उलट ती म्हणे, "विन्या, उत्तम गृहस्थाश्रम केलास तर एकच पिढीचा उद्धार होईल, पण उत्तम ब्रह्मचर्य पाळलेंस तर सात पिढ्यांचा उद्धार होईल" आईच्या या वचनानुसार विनोबांनीं आपलें जीवन अत्यंत वैराग्यपूर्ण असेंच राखलें. गांधींच्या आश्रमांत असतांना

आई आजारी पडली म्हणून विनोबा तिला भेटावयास आले, तेव्हां ती त्यांना म्हणते, "विनोबा, आपलें काम सोडून तू का आलास ?" आईचें हें असामान्य कर्तृत्वच विनोबांना उपयोगी पडले आहे. ते नेहमी म्हणतात की "माझ्या ब्रह्मचर्याला माझी मातृभक्ति पुष्कळ अशी मदतरूप झाली आहे."

आईच्या वागण्याचा परिणाम मुलावर कसा होतो यासबंधीं अनेक मातांची चरित्रें पाहण्यासारखी आहेत. 'थोराच्या माता' या पुस्तकांत आलेली मातांची चरित्रें याच दृष्टीने निवडण्यात आलेली आहेत. एकदोन चरित्रासबधी थोडा खुलासा करणें आवश्यक आहे. बहुतेक चरित्रें ऐतिहासिक स्वरूपाची आहेत. तरी कांही ठिकाणी वास्तवतेचा फारसा भंग न करतां कल्पनेचें साह्य घेणे आवश्यक वाटलें आहे. इतिहास मानवी मनाचे सूक्ष्म व्यापार रगविण्याच्या कामी लंगडा पडतो; तेव्हां कल्पनेचें साह्य घेणेंच जरूर असतें. राधाबाई पेशवे, या थोर मातेचें चरित्र मला वाटतें, स्वतत्रपणे याच पुस्तकांत प्रथम आलें आहे. तत्कालिन पत्रांच्या साह्यानें शक्य तों वस्तुस्थितीस धरून हें चरित्र लिहिण्याचा प्रयत्न केला आहे. आर्याम्बेच्या चरित्राचे शेवटी श्रीशकराचार्यांच्या एका सुदर स्तोत्रातील कांहीं भाग दिला आहे. त्यांतील वयाचा उल्लेख पाहून तें स्तोत्र शकराचार्यांचें नसावें असा कांही लोकाचा तर्क असेल. परंतु स्तोत्रांतील भावार्थ पाहतां तें शकराचार्यांचेंच असावें असें समजून त्याचा उल्लेख केलेला आहे.

यानतर युरोपियन थोर मातांपैकी कौंट टॉल्स्टॉय याच्या आईसबधी येथें थोडा उल्लेख करणें जरूर आहे. टॉल्स्टॉय लहान म्हणजे अडीच तीन वर्षांचे असतांनाच त्यांची आई मरण पावली. पण अनेक साधनें जमवून त्यांनी आपल्या आईचें मोठें हृद्य चित्र रगविलें आहे. अर्थात् कल्पनेचा भाग यांत अधिक असण्याचा सभव आहे. याच चरित्राच्या शेवटी टॉल्स्टॉयच्या 'मावशी' चेंहि चरित्र मुद्दाम थोडक्यांत सांगितलें आहे.

एकत्र केलेली थोर मातांची चरित्रें या पुस्तकांत मराठी वाचकास माझ्या माहितीप्रमाणें प्रथमच वाचावयास मिळत आहेत. मातेची थोरवी काव्यद्वारें अनेक कवींनी प्रगट केली आहे. माझ्यासारख्या सामान्य माणसास तशा प्रकारची थोरवी वर्णन करणें शक्य नाहीं. तेव्हां झेपेल

असें चरित्र–कथनाचें काम अल्प बुद्धीनें केलें आहे. त्यांतील यशापयश जाणणें वाचकांचें काम आहे.

संत-कृपेचें वर्णन करतांना तुकोबांनीं मातृमहिमा थोडक्यांत गाइला आहे; तोच अभंग देऊन हें लांबलेलें मनोगत पूर्ण करतों.

लेंकरा लेववी माता अलकार । नाही अंतपार आवडीसी ॥
कृपेचें पोसणें तुमचे मी दीन । आजि संतजन मायबाप ॥
आरुष उत्तरीं सतोषे माऊली । कळवळुनि घाली हृदयांत ॥
पोटी आलें त्याचे नेणे गुणदोष । कल्याणाचि आस असावें हें ॥
मनाची ते चाली मोहाचिये सोई । ओघ गंगा काई परतों जाणें ॥
तुका म्हणे कोठें उदार मेघां शक्ति । माझी तृषा किती चातकाची ॥

आश्विन व० ७; १८७४ }
दि. १०।१०।१९५२ }

प्रह्लाद नरहर जोशी;
४३७ नारायण पेठ, पुणें २.

## अनुक्रमणिका

# कर्ण आणि पांच पांडव

**कर्ण** हा कुंतीला सूर्यापासून झालेला पुत्र.

कर्णासारखा दाता जगात सांपडणें कठीण आहे. अतिथिरूपानें येणाऱ्या इंद्रास आपल्या अंगावरचीं जन्मजात असणारीं कवचकुंडलें यानें दान करून टाकलीं. यानें धनुर्विद्येचा अभ्यास द्रोणाचार्यांच्या जवळ केला. फार मोठा योद्धा म्हणून तर याची ख्याती आहेच.

युधिष्ठिर, भीमसेन आणि अर्जुन हीं पंडु राजाचीं मुलें. धर्माचा अवतार म्हणून युधिष्ठिराची प्रसिद्धी आहे. थोर दर्जाचा पारमार्थिक, वृत्तीचा सात्त्विक, ईश्वरभक्त म्हणून याचा लौकिक मोठा आहे. भीम हा सर्वांपेक्षां बलानें श्रेष्ठ होता. कौरवांनीं केलेल्या सर्व अन्यायांचा सूड घ्यावा म्हणून याचा सारखा प्रयत्न असे. जरासंध, बकासुर, दुर्योधनादि भावडें याचा नाश यानेच केला. कुंतीचा तृतीय पुत्र अर्जुन हा धनुर्वीर म्हणून प्रसिद्ध आहे. शंकरापासून पाशुपत अस्त्र मिळवून यानें अनेक पराक्रम केले. कृष्णसखा म्हणून याचा लौकिक असून याच्याचमुळें सर्व जगास पावन करणारी भगवत्गीता श्रीकृष्ण-मुखांतून प्रगट झाली.

पांडूची दुसरी पत्नी माद्री. हिच्या दोन मुलांचीं नावें नकुल व सहदेव अशीं होतीं. परंतु माद्रीच्या नंतर कुंतीनेंच यांचें पालन पोषण उत्तम प्रकारें केलें. हे दोनहि पुत्र अश्विनीकुमारांच्या कृपेनें माद्रीस झालेले होते.

# १ : : कर्तव्यतत्पर कुंती माता

महाभारतांतील कुंती हें अत्यंत करुणरम्य चित्र आहे. सर्व पृथ्वीला जिंकणारी सोन्यासारखी पांच मुलें, परंतु या राजमातेला पहिल्यापासूनच विपत्तीत दिवस काढावे लागले. प्राणावर उठलेल्या घरच्याच शत्रूंना तिनें ओळखलें आणि त्यांच्यापासून आपल्या मुलांचा बचाव केला. कुंती ही यादव कुलांत जन्मास आली होती. शूर नांवाच्या राजाची कन्या म्हणजे वसुदेवाची सख्खी बहीण म्हणून कुंतीचा मान होता. ही यादवकन्या भगवान् श्रीकृष्णांची आत्या होती. परतु तिच्या जन्मापासूनच तिची अवहेलना सुरू झाली. मला जें पहिलें अपत्य होईल तें तुला देईन असें वचन शूर राजानें आपला आतेभाऊ कुंतीभोज याला दिलें होतें. त्याप्रमाणें कुंती हे पहिलें अपत्य शूरानें कुंतीभोजाला देऊन टाकलें. आईबापांपासून दूर होऊन लहानपणीच दुसऱ्याच्या घरीं राहणें हें कोणत्या मुलीस आवडणार ? अर्थात् कुंतीला हें पसंत नव्हतें. या तऱ्हेची बोचणी तिच्या चित्तांत सतत राहिली होती. पुढें एकदां श्रीकृष्णापाशीं तिनें आपलें दुखणें बोलून दाखविलें. मदमत्त झालेल्या कौरवांकडे शिष्टाईचें बोलणें करण्यासाठी श्रीकृष्ण ज्यावेळीं निघाला, तेव्हां कुंती त्याला म्हणाली, "कृष्णा, माझ्या या दुर्दैवासाठी मी सर्वच दोष एकट्या दुर्योधनालाच कसा देऊं ? माझा पिताच खरा दोषी आहे. निर्जीव संपत्तीप्रमाणें त्यानें कुंतीभोजास मला देऊन टाकलें. पित्यानें लहानपणीच माझी वंचना केली, तेव्हांपासूनच मी दुःख भोगीत आहें."

कुंतीभोजाच्या घरीच असतांना कुंतीवर एक भयंकर प्रसंग गुदरला. एके वर्षी पावसाळ्यांत दुर्वास ऋषि घरीं राहावयास आले. कुंतीनें त्यांची मनोभावें सेवा केली. सहसा प्रसन्न न होणारे दुर्वास कुंतीवर खूष झाले आणि त्यांनीं तिला एक मंत्र दिला व सांगितलें की, 'या मंत्राच्या साह्यानें ज्या देवाची तू प्रार्थना करशील तो देव आपल्या सामर्थ्यानें तुला पुत्र देईल.' यावेळीं कुंती प्रौढ झालेली नव्हती. मंत्राचा अर्थ व त्याचें सामर्थ्यहि तिला नीटसें प्रतीत होण्यासारखें नव्हतें. कुंतीची उत्सुकता

वाढली व तिनें तो मंत्र जपून श्रीसूर्यनारायणाची प्रार्थना केली. सूर्यदेव तिच्यासमोर येऊन उभे राहिले आणि सूर्याच्या सामर्थ्यामुळें कुतीचें कौमार्य नष्ट न होतां तिला सर्व शस्त्रधारी लोकांत श्रेष्ठ, देवपुत्राप्रमाणें शोभणारा, सहज कवचकुंडलानी तळपणारा कर्ण नावाचा मुलगा झाला. तरी पण जनलज्जा मनांत येऊन कुती खिन्न झाली. आपले नातलग काय म्हणतील या विचारानें ती गोंधळून गेली आणि याच भीतीनें तिनें या पहिल्या मुलास एका नदीत सोडून दिले. राधा नांवाच्या एका कोळी स्त्रीनें याचें संरक्षण केल्यावरून यास 'राधेय' असें नांव पडलें. हाच पुढें कर्ण म्हणून प्रसिद्धीस आला.

या प्रकारानंतर कुंतीचा विवाह स्वयवर पद्धतीनें झाला. कुंती आतां वयांत आलेली असून सर्वगुणसंपन्नयुक्त होती. अनेक राजांनी तिला मागणी घातली. परतु शेवटी स्वयंवराच्या वेळीं पांडु राजाच्या गळयांत तिनें माळ घातली. राजा पाडूशी कुतीचें लग्न मोठ्या थाटांत झालें आणि कुंतीला घेऊन पांडु राजा हस्तिनापुरास आला. त्या वेळच्या पद्धतीस अनुसरून पांडूनें मद्र देशाच्या राजकन्येबरोबर दुसरें लग्न केलें. या दुसऱ्या पत्नीचें नांव माद्री असें होतें. मनात थोडाहि सापत्नभाव न ठेवतां कुंतीनें या सवतीला फार ममतेनें वागविलें. कुंतीला युधिष्ठिर, भीमसेन आणि अर्जुन असे अत्यंत तेजस्वी आणि गुणवान पुत्र झाले. नकुल आणि सहदेव हे माद्रीचे पुत्र होत. पुढें पांडु राजाचें निधन झालें. माद्री व कुंती सती जाण्यास निघाल्या. परंतु कुंतीची किंमत माद्रीनेंहि ओळखली होती. तिनें सांगितलें, " कुती, मी मागें जिवंत राहिल्यास सर्व मुलांचा सांभाळ मला करतां येणार नाही. शिवाय मी तुझ्या व माझ्या मुलांत फरक करणार नाही असेंहि माझ्याच्यानें सांगवत नाहीं. तूं मात्र मुलांचें जतन चांगल्या प्रकारें करशील. " येवढें झाल्यानतर माद्री पांडूबरोबर सती गेली व पांच कोंवळ्या मुलांना वाढविण्याचा भार विधवा कुंतीवर येऊन पडला.

येथून कुंतीच्या कर्तृत्वास प्रारभ आहे. पांच मुलांसहित ती राजा धृतराष्ट्राजवळ येऊन राहिली; आणि येथूनच अनेक संकटें निर्माण झाली. धृतराष्ट्राच्या मुलांच्या मनांत पांडवांबद्दल द्वेष निर्माण होऊन त्यांना

ठार मारण्याचे कट होऊं लागले. भीमावर पहिला विषप्रयोग झाला आपले शत्रू किती भयंकर आहेत, त्यांची कृष्णकृत्यें किती दुष्ट प्रकारची आहेत याची जाणीव विदुरानें कुंतीला दिली. भीमसेन कसाबसा बचावला. विधवा आणि असाह्य असणारी कुती आपल्या अनाथ मुलांचें सरक्षण कसें करणार ? आणि आपत्ती तर सारख्या कोसळत होत्या. परतु कुती धैर्यवान होती. दुष्ट राजसत्तेच्या कारस्थानांतून ती आपल्या मुलांना वांचवीत होती. कुतीला दुसऱ्याच्या दुःखानें दुःख होई. औदार्य हा तिचा मुख्य गुण होता. एकदां एकचक्रा नगरीत एका ब्राह्मणाच्या घरी आपल्या मुलांना घेऊन राहण्याचा प्रसग कुंतीवर होता. त्या ठिकाणी एक निराळेंच सकट उभें राहिलें. पांडव बाहेर गेले होते, एकटी कुंतीच घरी होती. तों त्या ब्राह्मण कुटुबांतून रडण्याचे सूर तिच्या कानी आले. तिनें चौकशी केली तों तिला समजलें की बकासुर नांवाचा कोणी एक राक्षस आहे. कराराप्रमाणें या घरांतील आज एक माणूस त्याच्या भोजनासाठी पाठविणें आहे. कोणी जावें याबद्दल बाप, आई व मुलें यांच्यांत वाद सुरू आहे. बाप म्हणतो मी जाणार, आई म्हणते मी जगून काय करूं ? आणि मुलें बोलतात मग आम्ही पोटी कशास आलों ? गरीब ब्राह्मणकुटुबावरील हा प्रसंग पाहून कुतीचें अंतःकरण द्रवलें. ती बोलली, " तुमच्यांपैकी कोणीहि जाऊं नका. देवाच्या दयेनें मला पांच मुलें आहेत. त्यांतील एक पाठवीन मी. " परतु ब्राह्मण या गोष्टीस कसा तयार होणार ? पण कुंती म्हणाली 'माझा तृतीयपुत्र सुदैवानें महाबलवान आहे, तो त्या राक्षसाला ठारच करील.' आणि भीमसेन बकासुराकडे गेला. ही गोष्ट युधिष्ठिरास पसंत पडली नाही. परतु कुतीनें त्याला समजाविलें, " या ब्राह्मणाच्या घरी आपण इतके दिवस सुखानें राहिलों. उपकाराची फेड प्रत्युपकारानेंच करावी. भीमाच्या अंगी दहा हजार हत्तींचें बळ आहे. केवळ बुद्धिपूर्वक पौर पाडावयाचें धर्मकृत्य म्हणून भीमास मी पाठविलें आहे. " भीमानें बकासुराचा नायनाट कसा केला हें प्रसिद्धच आहे.

थोरल्या मुलाच्या द्यूतप्रियतेमुळें आणि कमालाच्या सत्त्वशीलतेमुळें कुंतीचें दुर्दैव ओढवलें. युधिष्ठिराचें सर्व राज्य गेलें. पांडव कौरवांचे दास

बनले. सम्राज्ञी म्हणून जिचा लौकिक अशी सून द्रौपदी, तिचे कोण हाल सुरू झाले! भर सभेंत नग्न होण्याचा प्रसंग द्रौपदीवर आला. तिच्या करुण किकाळ्यांनी कुतीच्या हृदयांत चर्र झालें. वनवासास निघतांना द्रौपदी वदन करण्यासाठी कुतीजवळ आली. या तेजस्वी पण असाह्य सुनेला काय आशीर्वाद द्यावा हें वृद्ध कुतीला समजेना. ती शोकविव्हल होऊन बोलली, " तू शीलसपन्न आहेस. घोर संकटांत असलीस तरी मन खंबीर ठेव. द्रौपदी, तू बापाच्या व पतीच्या दोनहि कुळाना भूषविलें आहेस. जा, धर्मच तुझे रक्षण करील आणि तुला कल्याणकारक दिवस प्राप्त होतील. सहदेव सर्वात धाकटा आहे. त्याची नीट काळजी घे. त्याच्या मनांत औदासीन्य उत्पन्न होऊं देऊ नकोस. "

कुंती धैर्यानें निरोप देत होती, पण ज्या वेळी खरोखरीच पाडव वनांत निघाले तेव्हां तिच्या विलापास सीमाच उरली नाही. तिला फारच शोक झाला. " माझ्यासारख्या दुर्दैवी स्त्रीच्या पदरी तुमचा जन्म झाला हाच तुमचा दोष नसेल ना? वीर्य, सत्त्व, बल, उत्साह व तेज यांनीं सपन्न असणारे तुम्ही घोर वनात नादणार तरी कसे?...तुमचे वडील आणि ती सती माद्री खरोखरीच धन्य होय. मी जिवत राहून दुःखाशिवाय काय मिळविलें?...मुलांनों, मी येतें तुमच्याबरोबर वनांत...द्रौपदी, या वृद्ध सासूवर तुझें पूर्वीप्रमाणें प्रेम नाही कां?...हे द्वारकावासी श्रीकृष्णा, माझ्या मुलांची दया तुला काहीच येत नाही का? सहदेवा, माझ्या शरीरापेक्षांहि तूं मला अधिक प्रिय आहेस. तूं तरी वनांत न जातां माझे-जवळ रहा. एखाद्या कुपुत्राप्रमाणें माझा त्याग करूं नकोस." दुःखानें व्यथित झालेल्या कुंतीचें सांत्वन करून विदुरानें तिला आपल्या घरी नेलें.

पुत्रवियोगाचें दुःख भोगीत कुंती तेरा वर्षे विदुराच्या घरीं होती. आशा ही की आपले पुत्र पराक्रमी आहेत, पुनः राज्य मिळवतील. पण पुनः केवळ पांच गांवें घेऊन धर्म संधि करावयास तयार झालासें पाहून कुंतीस सात्त्विक संताप आला. भगवान् श्रीकृष्ण शिष्टाईसाठी निघाले होते. द्रौपदीच्या विटंबनेची स्मृति तिला अस्वस्थ करीत होती. क्रोधानें लाल होऊन कुंती श्रीकृष्णास म्हणाली, " धर्म, भीम, अर्जुन, नकुल आणि सहदेव

हे माझे पराक्रमी पुत्र डोळे उघडे ठेवून पाहात असतां भर सभेंत कौरवांनीं द्रौपदीला ओढीत आणली; हें आठवलें की या पुत्रांविषयी मला मुळीच प्रेम वाटत नाही. क्रोध व लोभ यांच्या स्वाधीन होऊन त्या दुष्टांनीं तिची विटंबना आरंभली. याखेरीज दुःखाची गोष्ट कोणती ?"

शिष्टाईनंतर श्रीकृष्णांनी पुनः कुंतीची भेट घेतली आणि पुत्रांना सांगावयाचा निरोप विचारला. तेव्हां कुंतीनें श्रीकृष्णास विदुलेची वीर-गाथा सांगितली. कुंतीनें आपल्या मुलाना तेजस्वी संदेश धाडला. या वेळीं कुंती साक्षात् जणुं विद्युल्लताच होती. मरणाराला उठविण्याचें सामर्थ्य या कुंतीच्या बोलांत आहे. नेभळ्या बनलेल्या आपल्या पुत्रांना तिनें क्षात्रधर्म समजावून सांगितला.

"श्रीकृष्णा, धर्माला जाऊन सांग की धर्म धर्म म्हणतां तुझ्या हातून अधर्म होत आहे. भलत्याच गोष्टीला धर्म म्हणून तूं कवटाळून बसला आहेस. तू राजा आहेस. पितृपरंपरेनें आलेल्या राजधर्माकडे तूं लक्ष दे. भिक्षा मागून पोट भरणें हा ब्राह्मणधर्म आहे. प्रजापालन करणें हा क्षत्रि-यांचा धर्म आहे. तूं बाहुबलानें स्वतःचें उपजीवन चालविणारा क्षत्रिय आहेस. तुझ्यासारख्याला जन्म देऊन मीं तुझ्या आईनें दुसऱ्याच्या घरच्या पिंडांवर आपली उपजीविका करावी यासारखी लाजिरवाणी दुसरी गोष्ट कोणती ? राजधर्माप्रमाणें तूं युद्ध कर. दुष्टांचा नाश करणारा व धर्मानुसार वागणाऱ्यांचें रक्षण करणारा पराक्रमी वीरच आपणास पुत्र व्हावा अशी खऱ्या क्षत्रिय स्त्रीची इच्छा असते. मी क्षत्रिया आहें. तूं माझा पुत्र आहेस काय ? नेहमी प्रतिकारासाठी उद्युक्त असणाऱ्या भीमसेनाला कृष्णा, माझा निरोप सांग की, कौरवांचा नाश केल्याशिवाय तुझ्या अंतः-करणाला कधीहि शांति लाभणार नाही. माद्रीकुमारांना सांग की प्राणा-पेक्षांहि पराक्रमानें मिळविलेले भोग भोगण्याचीच इच्छा तुम्ही धरा. क्षत्रिय धर्मानुसार वागून पराक्रमानें संपत्तीचा उपभोग घेणारे धन्य होत. श्रीकृष्णा, माझ्या मुलांना निरोप सांग की तुमच्या राज्याचा शत्रूंनीं अपहार केल्याचें, अथवा द्यूतांत तुमचा पराजय झाल्याचें दुःख मला होत नाही. पण माझी ती श्रेष्ठ सून भर सभेंत जो आक्रोश करीत होती; त्यामुळें अंतः-

करणाला घरें पडत आहेत. द्रौपदीच्या विटंबनेचा सूड अर्जुनानें कर्तव्य म्हणून घ्यावा. क्रोधायमान झालेले भीम व अर्जुन यमधर्मराज व मृत्यु यांच्या जोडीप्रमाणें भयंकर असून देवांनासुद्धां नष्ट करण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत आहे. श्रीकृष्णा, द्रौपदी-वस्त्रहरणाची आठवण तूं माझ्या पुत्रांना दे. त्यांचें कुशल मी विचारलें आहे म्हणून सांग. माझे पुत्र मी तुझ्या हातांत देतें. ''

कुंती मातेचा हा संदेश फार मोलाचा ठरला. कुलस्त्रीच्या आणि वंशाच्या गौरवार्थ कुरुक्षेत्राच्या रणांगणावर मदोन्मत्त झालेल्या दुष्टांच्या रक्ताच्या नद्या वाहिल्या. भयंकर संहार भारतीय युद्धांत झाला. मानव जातीला लागणारी कीड जळून भस्मसात झाली. आपल्या तेजस्वी मातेच्या उपदेशानुसार तिच्या पुत्रांनी शत्रूंचा नायनाट केला. पांडवांना साम्राज्याची प्राप्ति झाली. कुंतीचे डोळे निवले. पुत्रांच्या पराक्रमानें तिला स्वाभिमानाचें भरतें आलें. अनेक आपत्ती सोसल्यानंतर कुंती खऱ्या अर्थानें राजमाता बनली. परंतु त्या ऐश्वर्याचा उपभोग तिनें कसा घेतला ? कुंती खरी आर्य स्त्री होती. वैभवाचा उपभोग घेण्याऐवजी तिनें आपलें लक्ष आपल्या कर्तव्याकडे वळविलें. आपत्यापेक्षाहि दुःखीकष्टी झालेली गांधारी तिला दिसली. तिची सेवा कुंती करूं लागली. वृद्ध झालेला राजा धृतराष्ट्र गांधारीसहित अरण्यांत निघाला. कुंती पण त्यांचेबरोबर जाऊं लागली ! महाभारतकारांनी वर्णन केलें आहे, '' डोळ्यांना पट्टी बांधलेली गांधारी राजा धृतराष्ट्राबरोबर अरण्यांत जात असतां तिचा हात आपल्या खांद्यावर घेऊन राजमाता कुंती तिला आधार देऊन चालवीत होती; व राजा धृतराष्ट्र गांधारीच्या खांद्यावर हात ठेवून हळूहळू मार्ग आक्रमण करीत होता. राजवैभवाचा त्याग करून कुंती अरण्यांत निघाली होती ! युधिष्ठिरास अत्यंत दुःख झालें. तो आईस म्हणाला, '' कुंतीमाते, धृतराष्ट्र व गांधारी यांची सेवा करण्यासाठी मी वनांत जातों. आम्ही जिवंत असतांना तूं हे कष्ट आतां या वयांत भोगूं नकोस—'' पुत्राच्या या सांगण्यावर तिच्या डोळ्यांतून अश्रू ओघळूं लागले. तिनें दिलेलें उत्तरहि ध्यानांत ठेवण्यासारखें आहे.

तिनें निरवानिरव सुरू केली, "धर्मा, हा तुझा धाकटा बंधु सहदेव याच्यावर कधीहि रागावूं नकोस. त्याचें माझ्यावर व तुझ्यावर फार प्रेम आहे...द्रौपदीचें नेहमी प्रिय करणें हें तर तुझें कर्तव्य आहे. तूं सर्वांत मोठा आहेस. माझ्या नतर तू सर्वाचा नीट साभाळ कर. भीमसेन, अर्जुन व नकुल यांचेवर लक्ष ठेव. माझी काळजी कसली करतोस? गांधारी व धृतराष्ट्र हे माझ्या सासुसासऱ्यांप्रमाणें आहेत. यांची चरणसेवा करीत मी वनांतसुद्धां आनदानें राहीन. या वयात धूळ अंगावर बसलेल्या स्थितीत तपस्या करीत जीवन घालविणें हेंच माझे कर्तव्य आहे."

युधिष्ठिराचा शोक अनावर झाला. त्यानें विचारलें, "माते, तूं वनांत जाऊं नकोस. विदुलेची कथा साणून तूच आम्हाला हे राज्य मिळविण्यास सांगितलेंस. श्रीकृष्णाकरवी आलेल्या सदेशाप्रमाणें आम्ही हें राज्यसंपादन केलें आहे; आणि आतां तू जातेस? या साम्राज्याचा, आम्हा सर्व मुलांचा, आणि जिच्यावर तुझें फार प्रेम आहे त्या सुनेचा त्याग करून तूं अरण्यांत राहशील तरी कशी?"

पुत्राचे हे बोल ऐकून कुतीमाताहि विरघळली. पण तिचा निश्चय अविचल राहिला. भीमानें पुढें होऊन म्हटलें, "पुत्रांनी मिळविलेल्या या राज्यांत मिळणारे मानसन्मान सोडून तू वनात कां जातेस?" यावर कुंतीनें दिलेलें उत्तर अत्यत श्रेष्ठ दर्जाचें आणि खऱ्या भारतीय स्त्रीस शोभण्यासारखें आहे. ती आपल्या पुत्राना म्हणाली:

"आवश्यक कर्तव्य म्हणून मी तुमच्यात रणोत्साह निर्माण केला ही गोष्ट खरी आहे. सुखांतून परिभ्रष्ट झालेल्या, नातेवाइकानी तिरस्कृत केलेल्या द्यूतांत राज्याचा अपहार झालेल्या अशा माझ्या पुत्राचें तेज प्रदीप्त करणें हें माझें माता म्हणून कर्तव्य होतें. राजा पांडुसारख्या श्रेष्ठ पुरुषाची संतति नष्ट होऊं नये म्हणून तुम्हाला मी प्रोत्साहित केलें. क्षत्रिय कुळांत उत्पन्न झालेल्या अशा माझ्या मुलाचें कर्तव्य नीटपणें पार पडावें म्हणून मी तुमचें तेज फुलविलें. तुमच्या हातून अधर्म घडत होता. मी धर्म घडविला. शूर क्षत्रियांच्या स्त्रीची विटबना होणे अत्यत दुःखदायक. तुम्हांला आवश्यक तो क्रोध वाटावा म्हणून मी विदुलेची वीरगाथा सांगितली.

मला स्वतःला कांही उपभोग हवा होता, राजमाता म्हणून ऐश्वर्यानें मिरवावयास पाहिजे होतें म्हणून नाही तुम्हांला युद्ध करावयास लाविलें ! पतीच्या वेळी मी सर्व भोगले आहे. आतां राजैश्वर्य भोगण्याची कोणतीहि इच्छा उरलेली नाही. तुमच्या हातून धर्मपालन व्हावें येवढाच माझा हेतु होता. आतां एक शेवटची इच्छा आहे, धृतराष्ट्र-गांधारीची सेवा करीत असतां, तपश्चर्येंत मग्न असतांना, पतिलोक प्राप्त व्हावा. वीरमाता म्हणून माझें कर्तव्य आतां संपलें आहे. यापुढें कुरुकुळांतील विधवा सून म्हणून सासूसासऱ्यांची सेवा करणें हाच धर्म उरला आहे. यांची सेवा करून मी माझें शरीर झिजवीन...धर्मा, भीमादिकांना घेऊन राजधानीकडे जा. मी जातें. तुझी बुद्धि नेहमी धर्मांत रत होऊं देत; तुझें अंतःकरण विशाल होवो ! ''

धृतराष्ट्र-गांधारीबरोबर कुंती अरण्यांत गेली. सोळा वर्षे ती त्यांची सेवा करीत होती. मध्यतरी मातृभक्त पांडव आईस भेटून गेले. शेवटीं धृतराष्ट्र-गांधारीबरोबर अरण्यांतील वणव्याच्या अग्नीत कुंतीनें आपला देह समर्पण केला ! पुत्रांना पराक्रमास स्फुरण देणारी, कोसळलेल्या आपत्ति धैर्यानें सहन करणारी, राज्योपभोगापेक्षां स्वधर्मास, वडिलांच्या सेवेस श्रेष्ठ समजणारी ही कुंती माता भारताच्या सुपुत्रांना आजहि स्फूर्तिदायी ठरणारी आहे. तिचे चरित्र उज्ज्वल आहे. बोधप्रद आहे. कष्ट भोगत भोगत पुत्रांना कर्तव्योन्मुख करणारी त्यागी माता म्हणून तिची आठवण सर्व भारतवासियांनी ठेवली पाहिजे.

कुंतीच्या चरित्रातील एक भाग सांगावयाचा राहिला आहे. लग्नापूर्वी सूर्यापासून कर्ण नांवाचा तिला एक पुत्र झाल्याचें मागें आलें आहे. या पुत्रावरहि कुंतीमातेचें विलक्षण प्रेम होतें. कुलक्षय टाळण्यासाठी कुंतीनें कर्णाची भेट घेतली होती. त्याच्या जन्मरहस्याचा उलगडा तिनें त्याच्या जवळ करून म्हटलें, " कर्णा, तूं राधेय नाहीस. पांडवांप्रमाणेंच तू माझाच पुत्र आहेस. तू धृतराष्ट्राचा पक्ष सोडून दे. राज्यसंपत्ति उपभोगण्याचा अधिकार ज्येष्ठ पुत्र म्हणून तुझाच आहे. कर्णार्जुनांची जोडी बंधुप्रेमाचा आदर्श म्हणून ठरावी. '' परतु कर्णानें दुर्योधनाचा पक्ष

सोडला नाही. त्याच्या मृत्यूची जखम कुंतीच्या मनांत शेवटपर्यंत सलत होती. कर्ण मरेपर्यंत सूतपुत्र म्हणून राहिला. आतां त्याच्या वधानंतर तरी त्याला सद्‌गति मिळावी असें तिला मनापासून वाटत होतें. युद्धांत पतन पावलेल्या सर्व सुहृदांना तर्पण करण्यासाठी युधिष्ठिर गंगेकाठी बसला असतांना कर्णाच्या आठवणीनें कुंतीचें हृदय पिळवटून निघालें आणि शोकविव्हल कुंतीमाता बोलली,

"वीर अर्जुनानें जिंकलेला, व 'राधेय' सूतपुत्र म्हणून ज्याला तुम्ही ओळखतां तो कर्ण तुमचाच भाऊ होता. धर्मा, त्याच्या नांवानेंहि तर्पण कर. सूर्याप्रमाणें तेजस्वी असा हा पुत्र सूर्यापासूनच प्राप्त झाला होता." कुंतीच्या या रहस्यस्फोटामुळें सर्वांनाच दुःख झालें. कर्णाच्या विपरीत दैवाचें शल्य कुंतीमातेच्या हृदयांत एकसारखें अखेरपर्यंत बोचत होतें. धृतराष्ट्र-गांधारीबरोबर वनात जातांना सुद्धां तिला कर्णाचें स्मरण झालें. तिनें धर्मास बजावलें;

"धर्मा, सग्रामांतून कधींहि न परतणारा माझा पुत्र कर्ण ध्यानांत असूं दे. त्याला विसरू नकोस. दुष्ट बुद्धीनें व सगतीनें त्याचा युद्धांत नाश झाला. माझें हृदय जणूं लोखंडाचें असावें असें मला वाटतें. नाही तर कर्णाच्या स्मृतीनें तें विदीर्ण झाल्याखेरीज राहिलें नसतें. पण तुझ्या ध्यानांत असू दे कर्ण हा माझा मुलगा आहे. त्याच्या दातृत्वाला सीमा नव्हती. तूं त्याच्या निमित्तानें पुष्कळसें दान दे."

# श्रीमत् शंकराचार्य

(७८८–८२०)

आसेतुहिमाचल दिग्विजय करून अवघ्या बत्तीस वर्षांच्या थोड्या आयुष्यांत धर्मसंस्थापना करणारा अद्वितीय पुरुष म्हणून श्रीशंकराचार्यांची प्रसिद्धी आहे. भरतवर्षांत बुद्ध-जैन धर्मांच्या उदयापासून वैदिक धर्माचा लोप झाला होता. शंकराचार्यांनीं त्या ब्रह्मविद्येचा उद्धार केला. ब्रह्मसूत्रें, भगवद्गीता व उपनिषदें यांवरील त्यांचीं संस्कृत भाष्यें त्यांच्या असामान्य विद्वत्तेची साक्ष देणारीं आहेत. शंकराचार्य अद्वैतमतवादी व ज्ञानमार्गी म्हणून जरी प्रसिद्ध असले तरी त्यांनीं रचिलेल्या स्तोत्रांतून भक्तीचा जिव्हाळा अनेक ठिकाणीं व्यक्त झालेला दिसतो. अद्वैत तत्त्वज्ञान व कोमल भक्ति यांचा मधुर संगम शंकराचार्यांच्या वाङ्मयात दिसून येतो. यांचा अद्वैतबोध भक्तीनें आर्द्र झालेला आहे. आचार्यांची ग्रंथसंपत्ति अफाट आहे. वैदिक धर्माचें संघटन करून अद्वैत सिद्धान्तावर यांनीं हिन्दु धर्माचा पाया भरभक्कम केला. सद्धर्म-संस्थापक व जगद्गुरु म्हणून यांची कीर्ति सर्व भारतांत पसरली आहे.

## २ : : भाग्यवंत माता आर्याम्बा

हजार बाराशें वर्षांपूर्वीची गोष्ट. केरळ प्रान्तांतील पूर्णा नदीवर स्नानास जाण्याचा नित्यनेम श्रीअंबिकेनें केलेला होता. नदी घरापासून फार दूर होती, त्यामुळें कधीकधी तिला कष्ट पडत. एके दिवशी नियमाप्रमाणें ती स्नानास निघाली. घरून निघतानाच ऊन झालें होतें. वाटेंत पायाला चागलेच चटके बसत होते. हा प्रखर ताप श्रीअंबिकेला सहन झाला नाही. तिला घेरी आली व ती वाटेंतच बेशुद्ध होऊन पडली. जवळपासची माणसें धांवून आली, आणि त्याच अवस्थेंत त्यांनी तिला घरी आणलें. घरांत सात आठ वर्षांचा शंकर होता. आईची ही अवस्था पाहतांच तो चरकून गेला. आईबरोबर आपण जावयास हवें होतें हाहि विचार त्याच्या चित्तास चाटून गेला. त्याच दुःखित आणि सभ्रमाच्या अवस्थेंत आईला सावध करण्यासाठी त्यानें उपचार करण्यास आरंभ केला. थोड्या वेळानें श्रीअंबिका शुद्धीवर येऊन तिनें डोळे उघडले. शंकरनें हांक मारिली ‘ आई ! ’ आईनेंहि कनवाळुपणानें आपल्या पुत्राकडे पाहिलें. तुझीमाझी भेट होते की नाही असा अभिप्राय त्या पाहण्यांत होता. शंकरानें मनाशीं विचार केला. आपली आई आतां वृद्ध होत चालली. किती दिवस तिनें हें खडतर व्रत आपणासाठी करावयाचें ! नदी तरी किती लांब ! शंकरला एक उपाय सुचला. ताबडतोब तो पूर्णा नदीकांठीं आला आणि हात जोडून त्यानें विनंति केली, “ माते, भगवती पूर्णादेवी, सर्वांची दुःखें दूर करणारी तूं साक्षात् माता आहेस. माझी आई आतां वृद्ध झाली आहे. आजपर्यंत येथें येऊन स्नान करण्याचा तिचा नियम होता. एक दिवस सुद्धां तिच्या नित्यनेमांत खंड पडला नाहीं. तुझ्यावर तिची पूर्ण भक्ति आहे. पण आतां तिच्याच्यानें येथवर येणें होणार नाही. तेव्हां हे गंगामाते, तूंच माझ्या घराशेजारून वहा ना ! म्हणजे माझ्या आईस जवळच्या जवळ तुझ्या स्नानाचा लाभ होईल. ”

शंकराची ही प्रार्थना पूर्णा नदीनें ऐकली. शकराच्या घराजवळून ती वाहूं लागली ! येवढ्या लहानशा वयांत पुत्रानें केलेला हा पराक्रम पाहून मातेस धन्य झालें. नदीच्या वाहत्या ओघाकडे आणि पुत्राच्या तेजस्वी मुखाकडे बघतां बघतां मातेला अस्मान ठेंगणें झालें.

या आख्यायिकेवरून श्रीमद्जगद्गुरु शंकराचार्य यांचें आपल्या आई-वर केवढें प्रेम होतें हें दिसून येतें. शकराचार्यांच्या या दैवीशक्तीचा विकास दोनतीन पिढ्यांपासून होत होता. केरळप्रान्त म्हणजे हल्लीचा मलबार प्रान्त. निसर्गदेवतेचा वरदहस्त या प्रदेशावर आहे. याच प्रान्तांतील कालडी हें गांव आज कोचीन-शोरनूर लाईनवर अलव्हायपासून पूर्वेस सहा मैलांवर आहे. या गांवी पूर्वी विद्याधिराज नांवाचा ब्राह्मण रहात होता. त्याची वृत्ति मोठी धार्मिक असून आचरणहि अत्यंत सोज्वल असें होतें. वेदशास्त्रांचा अभ्यासहि त्यानें उत्तम प्रकारें केला होता. त्याच्या मुलाचें नांव शिवगुरु असें होतें. हाहि मुलगा गुरुगृही राहून चारी वेद आणि सहा शास्त्रें यांच्या अभ्यासांत पारगत झाला. त्याच्या अंगी विद्व-त्तेबरोबर वैराग्यहि उमटत होतें. गृहस्थाश्रम न पत्करतां एकदम सन्यासाश्रम स्वीकारावा अशी त्याची इच्छा होती. गुरुजी परवानगी देत नव्हते. त्या दोघांचा वाद चालू असतांना विद्याधिराज आपल्या मुलास नेण्यास नेमका येथें आला. त्यामुळें शिवगुरूस घरी जाणें भाग पडलें. विद्यासंपन्न पुत्र पाहतांच शिवगुरूच्या मातेस अत्यंत समाधान झालें आणि हळूहळू घरांत लग्नाची बोलणी निघाली. शेवटी हो ना करता करतां शिवगुरूनें लग्नाची संमति दिली. मघपंडित नांवाच्या विद्वान ब्राह्मणाची कन्या आर्याम्बा म्हणून होती. तिच्याशी शिवगुरूचें लग्न मोठ्या थाटांत झालें.

आर्याम्बाचे ठिकाणी अनेक प्रकारचे सद्गुण होते. नवऱ्याच्या हरएक कामांत ती साहाय्य देऊं लागली. घरांत सर्व तऱ्हेची समृद्धि होती. कोणत्याहि गोष्टीची कमतरता उरली नव्हती. परतु बरीच वर्षे झाली तरी घरांत मूलबाळ रांगूं लागलें नव्हतें. शिवगुरु आणि आर्याम्बा, ( हिला श्रीअंबिका असेंहि म्हणत ) यांना मनांतून खिन्नता वाटे. आर्याम्बाच्या सुखाचा पूर्णचंद्र पुत्रदर्शनानेंच शोभणार होता. अलीकडे तिच्या मुखावर म्लानता

दिसत होती. तिचें नांव फक्त श्रीअबा (माता) या अर्थी होतें. परंतु प्रत्यक्षांत तो अनुभव नव्हता. निपुत्रिकाला चांगली गतीहि मिळत नाहीं यावर त्या दोघांचा विश्वास होता. 'अपुत्रस्य गतिर्नास्ति' या धर्मशास्त्राची जाणीव शिवगुरूला सुद्धां होती. एक दिवस आर्याम्बा शिवगुरूना म्हणाली, "मला एक उपाय सुचला आहे. आपलें घराणें शकराचें उपासक आहे. पुत्रप्राप्तीसाठी आपण श्रीशकराची निष्ठेनें उपासना करू. तो कैलासराणा खात्रीनें आपली इच्छा पूर्ण करील; आपलें इच्छित साध्य होईल."

शिवगुरूंना कल्पना पसत पडली. पण शकराला प्रसन्न करून घेणें सोपें काम नव्हतें. परतु दोघाच्याहि विचारें उपासना करावी असें ठरलें. नित्याचा आहार सोडून शिवगुरूनी तपश्चर्येस प्रारभ केला. आर्याम्बानेंहि मनोभावें शकराची पूजा करण्यास आणि पतीला साह्य करण्यास सुरुवात केली. बरेच दिवस कठोर तपाचरण झाल्यानतर श्रीशंकर प्रसन्न झाले. शिवगुरु आणि आर्याम्बा याना पराकोटीचा आनद झाला. कशासाठी हा तपश्चर्येचा यज्ञ चालला होता हें शकरांनी हेरलेंच होतें. परतु परमेश्वरानें एक विचित्र प्रश्न आर्याम्बेपुढें टाकला. त्यांनी विचारलें;

"तुम्हांस पुत्र पाहिजे. पण तो कसा हवा? सर्व जाणणारा अगदीं शहाणा की मूर्ख? सर्वज्ञ पुत्र पाहिजे असेल तर अल्पायु मिळेल आणि मूर्ख पाहिजे असेल तर दीर्घायुधी असे वाटेल तेवढे पुत्र मिळतील. बोला काय हवें ते."

क्षणभर विचार करून शिवगुरुंनी उत्तर दिलें, "प्रभो, सर्वज्ञ, सद्-गुणी व सर्वशक्तिमान् असा एक मुलगा द्या. मग तो अल्पायु असला तरी चालेल." शकरानाहि या उत्तरानें समाधान वाटलें. 'तथास्तु' म्हणून त्यांनी सांगितलें की, मीच तुमच्या घरी जन्म घेईन.

आणि शंकरांनी आपलें म्हणणें खरें केलें. गर्भवती आर्याम्बाच्या अंगावरील कांति वाढू लागली. तिच्या डोळ्यांत एक विलक्षण प्रकारचें तेज चमकूं लागलें. बोलण्याचालण्यांत एक प्रकारचें गांभीर्य आलें. शेवटीं नऊ महिने पूर्ण होतांच तिला वैशाख शु. १० शके ७१० (२० एप्रिल ७८८) या दिवशी पुत्ररत्न झालें. प्रत्यक्ष श्रीशकरांनी अवतार घेतला.

सर्वत्र आनंदीआनंद झाला. ब्राह्मणांना दानधर्म पुष्कळ झाला, गोदान झालें. भूमिदान झालें. वृक्षवेलींनी पुष्पवृष्टि केली, नद्यांचे ओघ पवित्र झाले, वारा सुगंधित होऊन वाहूं लागला. पशुपक्ष्यांनी आपलें गायन सुरूं केलें. सर्व सृष्टि धवळून गेली. पुत्रप्राप्तीच्या सुखानें आर्याम्बा तर आनंदानें न्हाऊन निघाली होती. इतकी वर्षे मनच्यामनी दडून राहिलेलें वात्सल्य सहस्रधारांनी तिच्या स्तनांतून बाहेर प्रगटत होतें. तपश्चर्येचें हें अवर्णनीय फळ पाहून तिला मनस्वी सुख वाटलें.

शिवगुरु हे नबुद्री ब्राह्मणापैकी होते. सर्व धार्मिक विधि यथासांग झाले. शंकराच्या प्रसादानें मुलगा झालेला असल्यामुळें नांव शंकरच ठेवण्यांत आलें. उपाध्याय ज्योतिषी येऊन त्यांनी मुलाचें भविष्य वर्तविलें. " आपलें भाग्य फार मोठे म्हणून हें रत्न आपल्या उदरी जन्मास आलें. याचा अधिकार फार मोठा आहे. हा मुलगा सर्वज्ञ होऊन सर्व जगाच्या गुरुस्थानी जाऊन पोंहोचेल. बृहस्पतीसारख्या महापडितांनाहि वादांत जिंकेल. " पुत्रासबधी भविष्यकथन ऐकून आर्याम्बेच्या चित्तांत सतोष होत होता. आर्याम्बेच्या मांडीवरील हें ' परब्रह्माचें रूप ' हळूहळूं वाढूं लागलें. दररोज निरनिराळ्या होणाऱ्या त्याच्या बाललीला आणि त्याच्या मुखांतून निघणारे नवेनवे बोल यांखेरीज आर्याम्बेला दुसरा विषय नव्हता. त्याच्या बोबड्या बोलांत आर्याम्बेला साक्षात् वेददर्शन होत असे. घरच्या घरीच शंकरच्या शिक्षणास आरभ झाला. शिवगुरूसारखा महापंडित पिता, आणि आर्याम्बेसारखी तत्पर माता, यांच्या सान्निध्यांत वयाच्या तिसऱ्या वर्षा-च्या आंतच शंकरानें कितीतरी ज्ञान संपादन केलें. संस्कृत भाषेंतच तो बोलूं लागला. काव्यें, पुराणें, आख्यायिका त्यानें सहज आत्मसात् करून टाकल्या. त्याची पाठांतर शक्तिहि विलक्षण होती. एकदां कोणतीहि गोष्ट वाचली की पुन्हां पहावी लागत नसे. या अचाट बुद्धिवैभवानें प्रत्यक्ष आर्याम्बाहि दिपून जात असे. तिसऱ्या वर्षी चौल कर्माचा संस्कार झाल्यानंतर शंकराच्या वेदाध्ययनास प्रारभ झाला आणि त्याच्या वयाच्या पांचव्या वर्षीच त्याची मुंज करावी असा बेत ठरला. शिवगुरु त्या योजनेस लागले.

परंतु दैवांत कांहीं निराळेंच लिहिलें होतें. आर्याम्बेवर एकाएकीं आघात

झाला. भरल्या संसारांत राहून पुत्राच्या कौतुकाचा वाटा शिवगुरूंना मिळणार नव्हता. आकस्मिक रीत्या शिवगुरूचें निधन झालें ! आर्याम्बा दुःखानें व्यथित झाली. काय होतें आणि काय झालें याचाच अंदाज तिला लागेना. आर्याम्बेच्या शोकाला सीमा उरली नाही. लहानग्या शंकरानें तिचें सांत्वन अनेक प्रकारें केलें आणि पुत्राकडे पाहून तिनें आपला शोकाचा आवेग आवरतां घेतला. शिवगुरूंच्या इच्छेप्रमाणें शंकराचा उपनयन समारभ त्याच्या पांचव्या वर्षीच करण्याचा तिनें बेत केला. सर्व साहित्याची जमवाजमव आर्याम्बेनें केली. आपल्या आप्तवर्गीयांना आमंत्रण दिलें आणि एके दिवशी शुभ मुहूर्तावर शकराची मुज झाली. मौंजी-बंधनानतर मुलगा विद्याभ्यासासाठी गुरुगृही जाणार, शिवगुरु नुकतेच निधन पावलेले; या अवस्थेंत आर्याम्बेच्या चित्तांत गडबड उडून गेली. परंतु पुत्राच्या विद्येकडे दुर्लक्ष तिनें मुळीच केले नाही. कर्तव्य तिच्या डोळ्यांपुढें सारखें उभे होतें. नेत्रांतून पुत्रवियोगाच्या सारख्या धारा चालल्या होत्या, तरी शकर खूप मोठा होऊन येणार या खात्रीमुळें तिच्या चेहऱ्यावर एक प्रकारचें समाधान चमकत होतें. शकर गुरुगृही विद्याभ्यासासाठी गेला.

बुद्धिसामर्थ्य विलक्षण असल्यानें दोन वर्षातच त्यानें आपली सर्व प्रकारची विद्या सपविली आणि तो घरीं आला. आता त्याच्या मुखावर विद्येचें तेज संपूर्णपणें झळकत होतें. सात वर्षाचें पोर, पण मुखावर पाडि-त्याचा आणि गाभीर्याचा आविर्भाव विलक्षण होता. आर्याम्बा आतां थकत चालली होती. पुत्राच्या कर्तबगारीकडे लक्ष देऊनच तिचें जिणें चाललें होते. आईच्या सोयीसाठी शंकरनें पूर्णा नदी फिरवून आपल्या घराजवळ आणली आणि आर्याम्बेच्या सेवेत शकरानें आपलें लक्ष दिलें. यावेळी आर्याम्बेच्या मनांत निराळेच विचार चालू होते. शंकरला आतां आठवें वर्ष लागणार. त्याचा विवाह करावा, त्याचा प्रपंच सुंदर रीतीनें चाललेला पाहावा अशा प्रकारचे बेत ती मनात योजीत होती. आईचें हृदय तें ! पुत्राचा नित्य विकासच तें चिंतणार. शंकर एक दिवस आईजवळ बसला होता. आर्याम्बेनें त्याच्या अंगावरून वत्सलतेनें हात फिरवून म्हटलें,

"बाळा, एक मनची गोष्ट सांगूं का ?"

" आई, माझ्याच मनांतील गोष्ट एक अगोदर विचारतों. "

" बरं, बरं. विचार. "

" पण तूं कबूल झाली पाहिजेस. "

" अरे तूं सांग तर, तुझ्या सुखाखेरीज कां मला दुसरें कांहीं आहे ? तूं बोल काय तुझ्या मनांत आहे तें ! "

" आई, मला संन्यास घेण्यास परवानगी दे."

आठ वर्षांच्या कोवळ्या मुलाच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच आर्याम्बेचें चित्त जणूं दुभग झालें. तिच्या मनास बधिरता प्राप्त झाली. तिनें कोणतीं स्वप्नें आजवर पाहिली होती, आणि आज मुलाच्या मनांत हा काय विचार आला ? तिची चर्या कावरीबावरी झाली. नेत्रांतून झरझरा अश्रू ओघळूं लागले. चटकन शंकरला पोटाशी धरून ती बोलली, " शंकर, शंकर, येवढी निष्ठुरता कां करतोस ? हें कां सन्यास घेण्याचें तुझें वय ? सुखानं संसार कर. तुझ्या आईचे डोळे निवतील आणि मग संन्यासाचा विचार." यावर शकरानें वैराग्याचा बराच उपदेश आईस केला. परंतु मातृहृदयाला तो थोडाच रुचणार ? पोराच्या चिन्तेनें आर्याम्बा व्यथित झाली. दरम्यानच्या काळांत तिला श्रीशंकराच्या वरप्रसादाचीहि आठवण झाली. सर्वज्ञ परंतु अल्पायुषी मुलगा होईल असा वर होता. आतां मुलगा आठव्या वर्षीच जात आहे. घरांत दुसरें कोण ? ज्याच्या आधारावर आर्याम्बा जीव धरून होती तोच आतां संन्यास घेण्याचा विचार करीत आहे या जाणिवेनें आर्याम्बेच्या मनावर विलक्षण आघात झाला.

एके दिवशीं शंकर पूर्णेवर स्नानास गेला होता. त्याला पोहण्याची इच्छा झाली आणि पाण्यांत उडी टाकल्याबरोबर एका भल्या मोठ्या सुसरीनें त्याचा पाय धरला. त्याबरोबर शंकरनें ओरडण्यास सुरुवात केली. घरांत आर्याम्बेच्या कानावर या किंकाळ्या गेल्या. चट्कन ती नदीकांठीं आली, आणि समोरचा प्रकार पाहतांच तिनेंहि लोक जमविण्यासाठीं विलापास प्रारंभ केला. पुढें मगरीची आणि शंकराची झटापट चालली होती. आर्याम्बेला लक्षण कांही ठीक दिसेना. मध्येंच शंकरनें आईस सांगितलें.

" आई, तूं संन्यास घेण्यास मला परवानगी देशील तर सुसर पाय सोडण्यास तयार आहे. नाहीं तर ही कांहीं मला आतां सोडीत नाहीं. आईऽऽगंऽऽ"

शंकराची अवस्था पाहून मातृहृदयास पाझर फुटला. कोठेंहि असो, कसाहि राहो, पण शंकर सुखरूप असावा असें चिंतन करून तिनें शंकरास संन्यास घेण्यास परवानगी दिली, आणि शंकर नदींतून सुखरूपपणें कांठावर येऊन आईच्या चरणाशी लागला. त्याला उभे करून आर्याम्बेनें पोटाशी कवळून धरलें. दोघांच्याहि डोळयांतून सारख्या अश्रुधारा सुरू होत्या. काळाच्या मगरदाढेंतून शंकर सुटून आला होता म्हणून आईस समाधान वाटत होतें आणि संन्यासग्रहणाची परवानगी आईनें दिली म्हणून शंकरास आनंद झाला होता. संसाररूपी नक्राच्या दाढेंतून जणूं शंकराला सुटावयाचें होतें.

दुसऱ्या दिवशी पुनः तो विषय शंकरनें आईपाशीं काढला. आर्याम्बेला नाकारणें शक्य नव्हतें. परंतु मातृहृदयापुढें ब्रह्मांड उभें राहिलें. कोणत्या अवस्थेंत आपणास पुत्र झाला, पतिराजांच्या सन्निध राहून आपण तपश्चर्या कशी केली, भगवान् शंकर प्रसन्न कसे झाले, वरप्राप्तीनें मुलाचा लाभ कसा झाला, त्याच्या बाल लीलांनी हृदयकमल उमलत कसें गेलें ! शिवगुरूच्या आठवणीनें तर आर्याम्बा व्याकुलच झाली. त्या दुःखित हृदयाला पुत्राचा एकच आधार होता. पण तोहि आज सुटणार होता. मुलानें लग्न करून संसार थाटावा, मुलाला अनुरूप अशा मुलीशीं त्याचें लग्न होऊन सुनेचें मुख पहावें, ओकें ओकें वाटणारें घर पुनः मुलांबाळांनीं गजबजून जावें—हीं स्वप्नें कोणत्या आईच्या डोळयांसमोर नसतात ? परंतु आर्याम्बेला हें सुख मिळणार नव्हतें. हें खरें सुखच नव्हे असें तत्त्वज्ञान सर्व जगास सांगणारा तिचा मुलगा तिला सोडून जात होता !

शंकरानें आईस सांगितलें, " आई, मी आतां देशपर्यटणास जात आहें. तुला खाण्यापिण्याची फिकीर नाहीं. आप्तजनांचें लक्ष तुझ्याकडे राहीलच."

मुलाच्या तोंडचे शब्द ऐकताच आर्याम्बेला पुनः एकदां जोराचा उमाळा आला. मुलगा निघून जाणार या कल्पनेनेंच ती बधिर झाली होती. आतां प्रत्यक्षांत ही गोष्ट घडू पहात होती. ती बोलली,

"बाळ शंकर, येवढी निष्ठुरता कां करतोस? या वृद्ध आईनें कोणाच्या तोंडाकडे पहावें? मी आंधळी, माझ्या हातची तू काठी. तूंच आज निघून चाललास, मी कोणत्या आधारावर प्राण शिल्लक ठेवूं? परमेश्वरानें तुझ्यासारखा सद्गुणी पुत्र मला दिला, आणि तू आज मला नातेवाईकांच्या हवाली करून चालला आहेस. बाळा, तुला कांहींच दया येत नाहीं? तूं तिकडे देशांतरी हिंडत राहणार. माझें इकडे कांही बरें वाईट झालें तर? तर अन्त्यकर्म सुद्धां दुसऱ्याने करावयाचें! मग तुझ्यासारखा प्रतिसूर्य पोटीं असल्याचा काय उपयोग? शंकर, तू मला केव्हांच भेटणार नाहीस? निदान अंतसमयीं तरी या दुःखीकष्टी मातेची तू आठवण ठेवशील का?"

आईच्या विलापानें शंकरचें चित्त क्षणभर विरघळलें. शोकावेग कमी झाल्यावर त्यानें आईस सांगितलें, "आई, तू चिंता करू नकोस. मी आतां जातों. पण ज्यावेळीं आपला अंतकाळ जवळ आला असें तुला वाटेल तेव्हां माझें स्मरण कर. मी जेथें असेन तेथून परत येथें तुझ्याजवळ येईन आणि तुझी सर्व इच्छा पूर्ण करीन."

आर्याम्बेस थोडा धीर आला. केव्हा कां होईना पण पुनः पुत्राचें दर्शन होणार या कल्पनेनें तिला थोडी हुषारी आली. तिनें अतृप्त डोळ्यांनीं आपल्या पुत्राकडे पाहून घेतलें. जणू आपल्या चित्तांतच ती त्याला संपूर्णपणें सांठवून ठेवीत होती. परंतु डोळ्यांतून पुनः झरझर धारा सुरू झाल्या, पुत्राचें मुखहि तिला पुरतें दिसेना. तिच्या हृदयाला दारुण दुःख होत होतें. जगत्कल्याणासाठीं मुलगा जात आहे; परंतु स्वतःच्या चित्तांत पुत्रवियोगाचा डोंब उसळला आहे, अशा विलक्षण कात्रींत तिचें मन सांपडलें होतें. मातेची करुणगंभीर मूर्ति पाहून शंकराच्या मनांतहि चलबिचल झाल्यासारखी झाली. त्यानें चटकन् मातेच्या चरणांवर मस्तक ठेविलें. आईनें त्याला जवळ घेतलें. पुनः पुनः त्याच्या मस्तकावरून, अंगावरून ती हात फिरवीत

होती. अनेक सुखद स्मृति फिरून उचंबळून आल्या. परंतु कठोर कर्तव्यापुढें तिचें काही चाललें नाही. आपल्या बंधुजनांच्या स्वाधीन आर्याम्बेला करून शकरानें पुनः एकदां मातेच्या पायांवर डोकें ठेविलें. आईच्या आश्रूंचें त्याला स्नान घडलें. सर्व पुण्यतीर्थांनीं तो पावन होऊन गेला. जगाच्या उद्धाराचें सामर्थ्य त्याला आलें. शकर घरातून बाहेर पडला. जणू कुडीतून प्राण निघून चालला आहेसे वाटून आर्याम्बानें हंबरडा फोडला. "शकर ऽऽ ?"

दहाव्या वर्षी नर्मदातीरी ओंकारक्षेत्री गुरु गोविंद यतींच्याजवळ संन्यासग्रहण, पुढें चार वर्षे बदरीकाश्रमांत तपश्चर्या, सोळाव्या वर्षी शारीरभाष्याची रचना, भरतखंडभर पांडित्याचा गौरव, माहिष्मती येथें मंडनमिश्रादिकांचा वादविवादात पराभव, शृंगेरीस शारदा-मठ-स्थापना, या पायरींनी शकराचार्यांचा प्रभाव सर्वत्र दुमदुमून राहिला. पाखंडी लोकांनी चालविलेल्या बडाचा मोड होऊन पुनः वैदिक धर्मास स्थैर्य आणि तेज प्राप्त झालें.

शृंगेरी येथें आचार्य ध्यानांत निमग्न असतांना त्यांच्या लक्षांत आलें की घरी कालडी येथें आई अथरुणाला खिळून आहे. मृत्यूची छाया तिच्यावर पसरली आहे. लागलीच ते कालडी येथें आईजवळ आले. आर्याम्बा अंतिम क्षणी आपल्या लाडक्या शकराचें ध्यान करीत होती. मातेचें रुग्णचित्र पाहून या सन्यासी यतीलाहि गहिंवर आला. त्यांनी मातेच्या चरणांवर मस्तक नमवून 'आई' म्हणून हाक मारली.

कित्येक दिवसांत या हांकेची सवय आर्याम्बेला नव्हती. पण पुत्राच्या सान्निध्यानें, त्याच्या नुसत्या आठवणींनेंहि सुख मानणारी आर्याम्बा एका हांकेसरशी सावध झाली. तिनें डोळे उघडले. तिच्या किलकिल्या आणि अधू झालेल्या डोळ्यांनी सन्यासी वेषांतील 'शकर' तिला दिसला. पुत्राच्या अंगाखांद्यावर हात ठेवून म्हातारी उद्‌गारली, " बाळ, शंकर ! तूं आलास ? तूं आलास ? "

" हो आई, तू स्मरण केलेस ना ? कोणत्याहि परिस्थितींत मी असतों तरीं आलों असतों." आचार्य सद्गतित होऊन बोलत होते.

मृत्यूची सावली आर्याम्बेच्या मुखावर पडलेली होती. परतु पुत्रमुखांतील अमृतबिंदूंचा त्यावर वर्षाव होतांच त्याला टवटवी आली. क्षणभर तें नव्या उल्हासानें प्रफुल्ल झालें. सर्व अंग जर्जर होऊन गेलें होतें, शक्ति बिलकुल उरली नव्हती. आर्याम्बा आपल्या अद्वितीय पुत्रास पुनः पुनः न्याहळीत होती.

"आई, तुझी काय इच्छा आहे ?" आचार्यांनी हळुवारपणें विचारलें.

"बाळ, आतां कोणती इच्छा असणार ? तू जगद्गुरु झाल्याचे पाहिलें. डोळ्यांची तृप्तता झाली. शेवटी आईजवळ आलास; धन्यता वाटली. तुझ्याजवळ मला मरण येत आहे. उत्तमच गति मिळेल. शकर, या तुझ्या आईस तुझ्याजवळ मृत्यु येत आहे. किती आनदाची आणि भाग्याची गोष्ट ही !"

आईचा आवाज क्षीण होत चालला होता. आचार्यांनी आईला ब्रह्मज्ञानाचा थोडक्यांत उपदेश करून शकराची प्रार्थना सुरू केली. श्रीविष्णूची प्रार्थना केली; "प्रभो ! माझ्या आईस चांगली गति मिळो." आर्याम्बा भगवताच्या चरणीं विलीन झाली. आचार्यांच्या मुद्रेवर शोकगांभिर्याची छटा पसरली होती.

पुढच्या तयारीस आचार्य लागले. आप्तमडळी जमा झाली और्ध्वदेहिक कर्म कोणी करावयाचें असा प्रश्न निघाला. आचार्य म्हणाले, "मीच करणार ! मी तिचा पुत्र आहें ना ? मी तिला तसें वचन दिलें होतें."

नंबुद्री ब्राह्मण फार कर्मठ. त्यांनी सांगितलें, "आचार्य, ही गोष्ट होणार नाही. सन्यासश्रमांत हा अधिकार उरत नाही. तुम्हाला कांही करतां येणार नाही." आणि आचार्यांनी तर मातेस तसें वचन दिलेले ! तेव्हां शास्त्रार्थ बाजूला सारून, केवळ आईस दिलेल्या वचनासाठीं त्यांनी आर्याम्बेच्या अन्त्यकर्माची व्यवस्था चालविली; सर्व आप्तजन व शास्त्रीवर्ग विरुद्ध गेला. प्रेतास खांदा देण्यासहि कोणी तयार होईना. मोठा विचित्र प्रसंग निर्माण झाला; पण आचार्य डगमगले नाहीत. त्यांनी स्वतः काष्ठें गोळा केली. आपल्या घरच्या पसरांतच चिता रचून आईच्या देहाला अग्निसंस्कार दिला आणि पुढें मातुश्रीचें और्ध्वदेहिकहि स्वतःच पार पाडलें. आणि कांहीं दिवस त्यांनीं मातेच्या स्मृतीतच कालडी गांवांत वास्तव्य केलें.

आपल्या आईवर श्रीशंकराचार्यांची निःसीम भक्ति होती. त्यामुळेंच त्यांच्या तर्कनिष्ठ अद्वैततत्त्वज्ञानाला भक्तीचा जिव्हाळा येऊन मिळाला आहे. त्यांच्या सर्व ज्ञानाचा परिपाक भक्तीमध्यें झालेला दिसून येतो. त्यांच्या नांवावर असणाऱ्या विपुल अशा स्तोत्रवाङ्मयांत भक्तीची कोमलता सर्वत्र दिसून येते. मातृप्रेमाचें दर्शन सर्वत्र घडण्यासारखें आहे. देवीवरील एका स्तोत्रांत शंकराचार्यांनीं मोठ्या बहारीनें मातृमहिमा वर्णन केलेला आहे. त्यांत ते म्हणतातः

“ न मन्त्रं नो यन्त्रं तदपि च न जाने स्तुतिमहो ।
न चाह्वानं ध्यानं तदपि च न जाने स्तुतिकथाः ॥
न जाने मुद्रास्ते तदपि च न जाने विलपनं ।
परं जाने मातस्त्वदनुसरणं क्लेशहरणम् ॥ १ ॥

माते, मला मंत्र-तंत्र माहीत नाही, स्तुति येत नाहीं, आवाहन किंवा ध्यान कसें करावें यांचेंहि ज्ञान नाही. तुझ्या कथा कशा गाव्यात हेंहि समजत नाहीं. मला मुद्रांची माहिती नाही; फार काय, रडावें कसें हेंहि कळत नाहीं. पण एवढें मात्र निश्चित माहीत आहे की, तुझ्या सेवेपासून दुःख लयास जातें. ”

हें सर्वच स्तोत्र मातृप्रेमानें आर्द्र झालेलें आहे. याची भूमिकाहि मोठी हृद्य आहे. नाना देवांची आराधना करणें अत्यंत कष्टदायक काम असल्यामुळें तो नाद त्यांनी सोडून दिला; आणि वयाला तर ८५ वर्षे उलटून गेलीं; तरी चित्तास समाधान नाही; अशा अवस्थेंत श्रीशंकराचार्यांनी मातृदेवतेची आराधना केली आहे. “ माझे अपराध भरपूर आहेत; पण माते, माझे दोष पाहणें तुला शोभणार नाही– कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति—मुलगा वाईट निघेल पण आई कधीच वाईट असत नाही. – अपराधपरंपरावृतं नहि माता समुपेक्षते सुतम्– एकामागून एक असे अनंत अपराध करणाऱ्या मुलाची आई कधीच हयगय करीत नाहीं.– ” असा प्रार्थनेचा आशय आहे.

# श्रीसमर्थ रामदासस्वामी

( १६०८–१६८२ )

सतराव्या शतकांत ज्या तीन श्रेष्ठ विभूति होऊन गेल्या त्यांत श्रीसमर्थ रामदासस्वामींचें महत्त्व असामान्य आहे. रामभक्तीनें पावन झालेल्या पवित्र कुळांत जन्म घेऊन यांनीं महाराष्ट्रांत रामभक्तीचा प्रसार फार मोठ्या प्रमाणावर केला. आध्यात्मिक सामर्थ्याबरोबर शरीरसामर्थ्यहि अत्यंत आवश्यक आहे हें तत्त्व ओळखून यांनीं सबंध देशांत हनुमंताची उपासना सुरू केली. प्रवृत्ति धर्माचा प्रसार यांनींच केल्यामुळें शिवरायांच्या कार्याची पार्श्वभूमि उत्कृष्ट रीतीनें तयार झाली होती. ‘दासबोध’ हा यांचा प्रमुख ग्रंथ. अध्यात्म आणि व्यवहारधर्म यांचें उत्तम वित्ररण या त्यांच्या अलौकिक ग्रंथांत आहे. बारा वर्षें कडकडीत तपश्चर्या त्यांनीं केलेली असल्या-मुळें त्यांना मोठेंच सामर्थ्य प्राप्त झालें होतें. सबंध भारतांत बारा वर्षेपर्यंत परिभ्रमण करून यांनीं देशस्थितीचें चांगलें निरीक्षण करून योग्य तो उपदेश प्रापंचिकांना करून त्यांना परमार्थ ज्ञानहि उपलब्ध करून दिलें.

## ३ : : राणूबाई ठोसर

( —१६५५ )

जांब गावच्या सूर्याजीपत ठोसराच्या घरात एकच गोंधळ उडाला होता. धाकटा मुलगा नारायण सकाळपासून बेपत्ता झालेला असल्यामुळें त्याच्या थोरल्या भावाची त्याला शोधता शोधतां त्रेधा उडाली होती. आईचा जीव तर पुरता घाबरून गेला होता. त्यांतून ती त्याला आज सकाळी जरा बोलली होती. नारायण अति व्रात्य बनला होता. बरोबरच्या पोरांना घेऊन सदोदित रानावनांतून हिंडावें, झाडावर चढावें, उड्या माराव्यात, नदींत डुबत राहावे, अशा प्रकारचा नारायणाचा उपद्व्याप नेहमी चाल-लेला असे. तेव्हां एके दिवशी आईनें त्यास थोडें दटावले, "नारायणा, तूं शहाणपण शिकणार तरी केव्हा? पैसे मिळवून वडील भावाला मदत नको करावयास? तू आता मोठा झालास. तुझ्यासारख्यानी 'ससाराची चिंता' केली पाहिजे." आईचा हा उपदेश नारायणाने ऐकला तेव्हांपासून तो कोठें दिसेनासा झाला होता. घरीदारीं, रानावनात सर्वांनी पुष्कळ प्रकारें शोध केला. शेवटी त्याची आई काही कामानिमित्त घरांतील अडगळीच्या खोलींत गेली. तों नारायण आसनस्थ होऊन ध्यान करीत असलेला तिच्या दृष्टीस पडला. आई चकित झाली आणि तिनें विचारले, "बापा, काय हें करितोसी येकात स्थळी?" यावर नारायणानें आईस ताड्कन उत्तर दिले, "आई, चिंता करितों विश्वाची!"

बाल नारायणाचें उत्तर ऐकून आई चकित झाली. घराच्या संसाराची चिंता करावयास सांगितली तर नारायणानें विश्वाच्या संसाराची चिंता चालविली होती. याच नारायणाने खरोखरच पुढें साऱ्या विश्वाची काळजी केली. सबंध देशात असह्य जुल्म होत असल्यामुळें याचे चित्त दुभग झालें. या पीडित लोकाचें आतां होणार तरी काय? 'चिंतेनें ऊर फाटतो' असे उद्गार त्यानें मोठेपणी जगाचें अवलोकन केल्यावर काढले. विश्वचिंता करणारा हा नारायण म्हणजे प्रसिद्ध राष्ट्रपुरुष श्रीसमर्थ रामदासस्वामी आणि त्याला प्रसवणारी त्याची आई म्हणजे राणूबाई ठोसर.

समर्थ रामदास स्वामींचे पूर्वज कृष्णाजीपंत ठोसर हे पूर्वी बेदर प्रांतांत रहात असत. परंतु तेथें राज्यक्रांती झाली, दुष्काळ पडला, तेव्हां त्या प्रांतांतील लोक गंगातीरावर येऊन राहूं लागले. त्यांतच कृष्णाजीपंत ठोसर यांनीं गंगेच्या दक्षिण तीरावर हिवरें येथें वस्ती केली. त्यांच्या पांचहि पुत्रांनीं बीड प्रांतांत जोशी-कुलकर्ण्याची वृत्ति मिळविली. कृष्णाजीपंतांचे पुत्र दशरथ यांनी अंबड परगण्यात कांही गवळ्यांच्या मदतीनें जांब गांव वसविलें. या घराण्यांत पूर्वीपासून श्रीरामाची उपासना होती. दशरथाचा पुत्र रामजीपंत आणि त्यानतर विसावें पुरुष नारायण ऊर्फ रामदासस्वामी, समर्थांचे वडील सूर्याजीपंत व आजे त्र्यंबकपंत. सन १५६८ मध्यें सूर्याजी-पंतांचा जन्म झाला. हे गृहस्थ मोठे तपस्वी, भागवतधर्मी व अत्यंत धार्मिक वृत्तीचे होते. यांच्या पत्नीचें नांव राणूबाई. याहि फार सुशील, धर्माचरणतत्पर, पतिव्रता, आणि वैराग्यशील अशा होत्या. या पतिपत्नींनी बारा वर्षेपर्यंत पुत्रप्राप्तीसाठी सूर्याची उपासना केली. सूर्यदेव प्रसन्न झाले आणि त्यांनी सन १६०३ मध्यें राणूबाईस आशीर्वाद दिला. "तुला एक पुत्र मदंशेकरून होईल व दुसरा मारुती अंशेकरून होईल. पहिला पुत्र संसार उत्तम रीतीनें करील. दुसरा ब्रह्मचारी राहून जगाचा संसार नेटका चालवील." पुढें दोन वर्षांनी सन १६०५ मध्यें राणूबाईस पहिला मुलगा झाला. याचें नांव गंगाधर. हेच पुढें श्रेष्ठ ऊर्फ रामीरामदास म्हणून प्रसिद्धीस आले.

यानंतर दोन वर्षांनी राणूबाईस पुनः पुत्र होण्याचा समय प्राप्त झाला. थोर पुरुषाच्या जन्माच्या वेळीं अनेक घटना घडतात; आणि त्या त्या परि-स्थितीस आवश्यक अशा तऱ्हेचा श्रेष्ठ पुरुष जन्मास येतो. या श्रेष्ठ पुरुषाचें सारें कर्तृत्व त्याच्या आईच्या मुखावर उमटलेलें दिसून येतें. भाविक भक्तांनी श्रेष्ठ पुरुषांच्या मातांचे डोहाळे अनेक प्रकारें वर्णन केलेले असतात. त्यांत तथ्य असो वा नसो, एक गोष्ट मात्र मान्य होण्यासारखी आहे कीं आईच्या एकंदर वागण्यावरून मुलाचे गुणावगुण ध्यानांत येतात. राणूबाईस लागलेल्या डोहळ्यांचेंहि गमतीचें वर्णन कवींनीं केलें आहे. राणूबाई सूर्याजीपंतास सांगतेः

" गिरिकंदरें मज आवडती । घरें मंदिरें मज नावडती
हनुमानरूपें मी नरवानराकृती । नरनारायण निर्धारें ॥
मज पुनीत करणें रे कृष्णातीरा । अखड व्यापक मी चराचरां ।
मज नावडे ससार पसारा । आश्रम सर्वही श्रमरूप रे ॥

मज करणें धर्म-सस्थापन । मज करणें गोब्राह्मण प्रतिपालन ।
विशेष महाराष्ट्री शिवरायाकारणें । कैवार घेणें मजलागी ॥—"

अशा तऱ्हेचे डोहाळे राणूबाईस लागले होते म्हणून कवि सांगतो. शिवरायाचा जन्म यानतर बावीस वर्षांनी झाला. परतु कवीनें या डोहळ्यांत शिवरायाच्या साह्याचा उल्लेख आधीच केला आहे. अर्थात् भावार्थ जाणून घ्यावयाचा.

शके १५३० मधील चैत्र शु. ९ स म्हणजे रामजन्मा दिवशीं राणूबाई प्रसूत होऊन त्यांना मुलगा झाला. सूर्याजीपत प्रसिद्ध रामभक्त. घरी रामजन्माचा जयजयकार चाललेला असतांनाच घरांत पुत्ररत्न जन्मास आल्यामुळें जिकडेतिकडे आनंदी आनंद झाला. राणूमातेस धन्यता वाटली. पुत्राचें नांव, तो सूर्याच्या कृपेमुळें झाला असल्याकारणाने नारायण असें ठेवण्यांत आलें. नारायणाची उपजत् बुद्धि अति तीक्ष्ण होती. रूपावली, समासचक्र, अमरकोश, रुद्र आदींचें अध्ययन समर्थांनी फार झपाट्यानें केलें आणि तितकाच अचपलपणा खेळण्याहुदण्यांतहि त्यांनी दाखविला. यथाकाळीं दोनहि मुलांच्या मुजी झाल्या.

थोरल्या गंगाधराचें लग्न अबडकर घराण्यांतील एका मुलीशी झालें. सुनेचें नांव पार्वती ठेवण्यांत आलें. यानंतर सन १६१५ साली सूर्याजीपंतांचें निधन झाल्यामुळें कुटुंबाचा भार गंगाधरराव व राणूबाईवर येऊन पडला. पतिनिधनानतर राणूबाईची जबाबदारी वाढली. मुलाचा सांभाळ करतांनाही रामाच्या उपासनेंत राणूबाईनें खड पडू दिला नाही. धाकटा नारायण आईच्या सेवेंत तत्पर होताच. कोणतीहि गोष्ट आईस कमी पडूं द्यावयाची नाहीं असा जणूं त्याचा निश्चय होता. यासबंधी कांही आख्यायिका सांगण्यासारख्या आहेतः

राणूबाईच्या घरी कांही निमित्तानें प्रयोजन निघालें; त्यासाठी ताकाची जरूरी होती. नारायणाच्या कानावर ही गोष्ट आली. नारायणानें गुपचुप-रीतीनें गांवांतील सर्व घरी ' उद्यां आमच्या आईस ताक पाहिजे, मी भांडें आणून ठेवीन ' म्हणून सांगून ठेविलें. आणि सूर्योदयापूर्वी सर्वांच्या दाराशीं त्यानें एक एक भाडें ताकासाठीं म्हणून ठेवून दिलें. ब्राह्मण बायांनी ताकानें भांडी भरून दिल्यावर नारायणानें मागील दारानें आणून आंत ठेवली. राणू माता व भावजय सकाळी उठून पाहतात तों काय, घरांत ताकच ताक. नारायणाचें कसब राणूबाईनें हेरलें; आणि मनापासून त्यांनी त्याचें कौतुक केलें.

नारायणाची अशीच अचाट बुद्धि आणखी एका प्रसंगी पाहून आईस नवल वाटलें. सूर्याजीपतांचे घर लहान होतें, कोणी मोठे पाहुणे एकदां घरी आले व राणूबाईस म्हणाले " घर लहान पडतें. आल्यागेल्यास स्वतंत्र खोली असती तर बरें झालें असतें. " यावर राणूबाईनें उत्तर दिलें, " हो सारं खरं आहे, पण या आमच्या नारायणाच्या मनांत तें यावयास पाहिजे ना ! " आईचे हे उद्‌गार नारायणाच्या कानावर गेले मात्र. लागलीच त्यानें गांवांतील आपले सवंगडी जमा केले. दिवसभर खपून रानांतील लांकडें तोडून आणली आणि रातोरात श्रमून आईच्या शब्दा-खातर त्यानें एक नवीन खोली तयार केली !

हा नारायण फार हट्टी होता. राणू मातेस त्याचे हट्ट पुरवितां पुरवितां नको होई. एकदां दुधासाठी नारायणानें राणूबाईजवळ हट्ट धरला. भलत्या वेळीं घरांत दुधाचा थेंब नव्हता. घरांत गाय होती, पण ती गाभण असून आटलेली होती. ती दूध मुळीच देत नसे. नारायणानें तर आईचा पिच्छा पुर-विला. पोराला आईनें गाभण्या गाईजवळ नेलें आणि म्हटलें, " नारायणा, असा हट्ट करूं नये. ही पहा आपली गाय. ही व्याली म्हणजे मग काय दूधच दूध. " पण नारायण हट्ट सोडीना, काढ याच गाईची धार " त्यानें आग्रह धरला. आईनें त्याच्या समजुतीसाठी कासंडी घेऊन गाईच्या कासेंत हात घातला तों काय ! गाईला पान्हा फुटला आणि कासंडी दुधानें भरून आली. नारायणाच्या तोंडाकडे पहात राणूबाई सद्गदित अंतःकरणानें

बोलली, " नारायणा काय रे तुझा प्रताप हा ! " राणूमातेचें अंतःकरण पुत्रवात्सल्यानें भरून आलें!

अशा अनेक चमत्कारिक गोष्टी नारायण आणि राणूबाई यांच्या-संबंधानें सांगितल्या जातात. त्यातील खरेपणा तर्कबुद्धीनें तपासावयाचा नसून त्यांतला भावार्थ रसिकतेनें ओळखावयाचा असतो. थोरमोठ्यांच्या चरित्रांत बालपणी अशाच अद्‌भुत गोष्टी वर्णन केलेल्या असतात. एकतर लेखक चरित्रनायकास प्रारभापासून थोर कल्पित असतो; आणि दुसरें असें की कांही श्रेष्ठ व्यक्ति आरभापासूनच अलौकिक असतात. त्यांचें हें दिव्यत्व बापाला किंवा आईला कधीकधी समजतहि नसतें. एकदां राम-नवमीचा उत्सव होता. दुष्काळामुळे पुष्कळच लोक जेवावयास आले आणि ऐन पंगतीत तूप सरून गेलें. आता काय करावे अशी चिंता राणूबाईस पडली. तिच्या नारायणानें आईची काळजी ओळखून तुपाच्या मोकळ्या भांड्यांत दृष्टि टाकली आणि म्हटलें, " आई, तूप आहे ना पुष्कळ! " आईनें जाऊन पाहिलें तों खरेंच भांड्यांत तूप भरपूर दिसलें आणि नवल असें कीं सबध पगत झाली तरी तुपाचा तुटवडा पडला नाही.

अगदी अशीच गोष्ट येशू ख्रिस्ताच्या चरित्रात सापडते. मेरीच्या—येशूच्या आईच्या बहिणीच्या घरी ऐन पंगत बसलेली असतांना मद्याचें केलेलें पक्वान्न सरून गेलें. येशूच्या मावशीस चिंता लागून राहिली. तिनें आपल्या बहिणीस विचारलें, " काय ग ? तुझा पोरगा काही चमत्कार करतो. विचार ना त्याला या वेळी—" मेरीला आपल्या मुलाचे प्रताप माहीत नव्हते. परंतु असें सागतात की पाण्याच्या रांजणांतून येशूची दृष्टि फिरल्याबरोबर ते सर्व तांबड्यालाल मद्यानें भरून गेले!

राणूबाईस नारायणाचा एक एक प्रताप पाहून धन्यता वाटत होती; पण या पोराची वैराग्यवृत्ति पाहून तिला धास्ती निर्माण झाली. या पोराचें संसारांत लक्ष लागणार की नाही याबद्दल तिला शंका वाटत होती. तेव्हां लग्न करून द्यावें म्हणजे याचें चित्त ससारांत स्थिर होईल असें राणूबाईनें निश्चित केलें. सुनमुख पाहण्याचीहि कोण हौस राणूमातेला होती. आईनें लग्नाची गोष्ट काढतांच नारायणानें रानावनांत पलायन

केलें. वृक्षाच्या उंच ढाळीवर कोणीं पकडूं नये म्हणून तो जाऊन बसला, पण झोंक जाऊन खालीं नदींत पडल्यामुळें त्याच्या डोक्यास टेंगूळ आलें, अशी कथा आहे. थोरल्या भावानें राणूबाईस सांगितलें, "आई, याच्या लग्नाची गोष्ट आतां पुनः काढूं नकोस. नाहींतर हा बिथरून परत निघून जाईल." आईनें तात्पुरतें हो म्हटलें. पण मातेचें हृदय तें! त्याला वाटलें पुनः सांगून पहावें. नारायण माझें खचित ऐकेल, आणि त्याप्रमाणें राणूबाईनें त्याच्याजवळ लग्नाचा विषय पुनः काढला. "नारायणा, एक गोष्ट मानशील कां या आईची?" यावर नारायणानें चटकन् उत्तर दिलें, "हो आई, तुझ्या सांगण्याबाहेर मी जाणार नाही." राणूमातेस धीर येऊन ती म्हणाली, "लग्नाची गोष्ट काढली की तूं रागावतोस, पण 'अंतरपाट धरीपर्यंत' तूं कांही करूं नकोस. तुला माझ्या गळ्याची शपथ आहे." आईचे शब्द आज्ञा म्हणून मानण्याचें नारायणानें कबूल केलें. घरांत राणूबाईनें लग्नाची तयारी चालू ठेवली. आसनगांवी नारायणाचे मामा भानजीपंत होते, त्यांचीच मुलगी वधू म्हणून नेमस्त झाली. लग्नाचें वऱ्हाड आलें आणि लग्नसमयीं अंतरपाट धरला गेला. नारायण आईच्या शब्दांतून मुक्त होत होता. ब्राह्मणांनी 'सावधान' अशी अक्षरें उच्चारल्याबरोबर तोच उपदेश समजून नारायण बोहल्यावरून पळून गेला.

राणूमाता पोराचें विचित्र वर्तन पहातच राहिली!

नारायण निघून गेला. कोठें शोधायचा त्याला? राणूबाईनें रडून रडून डोळे सुजवून घेतले. हा नारायण आतां येणार तरी कधीं? कुठवर या माउलीनें वाट पाहावयाची? एक दिवस गेला, दोन गेले, तीन गेले,— एक वर्ष संपलें, दोन संपलीं, तीन संपली, चोवीस वर्षें होत आली, पण पुत्राचा पत्ता नाहीं. राणूबाई वाट पाहतां पाहतां थकून गेली; आणि या चोवीस वर्षांत तिचा नारायण गोदावरीच्या काठी पहिलीं बारा वर्षें तपश्चर्या करीत होता, आणि उरलेल्या बारा वर्षांत या बहाद्दरानें सबंध हिंदुस्थानच्या तीर्थयात्रा केल्या. लहानपणीं आईस 'विश्वाची चिंता करितों' असें वचन दिलें होतें, तें तो आतां पूर्ण करीत होता. काशी, प्रयाग, गया, हरिद्वार, करवीर, परशुरामक्षेत्र, महाबळेश्वर, पंढरपूर, भीमा-

शंकर, त्र्यंबकेश्वर, जेजुरी इत्यादि स्थळें त्यांनें डोळे उघडे ठेवून पाहिलीं. लोकांची हीनदीन अशी अवस्था त्याच्या अवलोकनांत आली, आणि त्यांना दुःखमुक्त करण्यासाठीं नारायण समर्थ रामदास बनले. सर्व तीर्थ-यात्रा झाल्यानंतर शेवटीं चोवीस वर्षांनीं रामदास महातीर्थास, मातृतीर्थास येण्यास निघाले. जांबेस जावें आणि वृद्ध आईचें दर्शन घेऊन तिची क्षमा मागावी असा विचार चोवीस वर्षांनीं रामदासांच्या मनांत आला.

जांबेस राणूबाई जराजर्जर होऊन अंथरुणावर खिळून राहिली होती. नारायणाच्या वियोगदुःखानें तिचें काळीज करपून गेलें होतें. वाट तरी किती पाहावी तिनें ! नारायण आतां कोठचा येणार, या विचारांत ती दिवस कठीत होती. तिच्या डोळ्यानाहि दिसत नव्हतें.

एके दिवशी सकाळी जांबेस समर्थांनीं आपल्या घरांत पाऊल टाकलें. सूर्याच्या आराधनेमुळें शरीर तेजःपुज झालें होतें. रोज बाराशें नमस्कार घालून शरीराला पिळदारपणा आला होता. पायांत खडावा, कमरेस लंगोटी, हातांत कुबडी आणि काखेंत झोळी; अशा या थांटात हा बैरागी आपल्या अंगणांत चोवीस वर्षांनीं पाऊल टाकीत होता ! ' जयजय रघुवीर समर्थ ' अशी गर्जना समर्थांनी खड्या आवाजांत केली. श्रेष्ठ बाहेर गेले होते. राणूबाई आंत माजघरांत अर्धवट झोपेंत होती. भावजय पार्वतीबाई बाहेर आली आणि तिनें बैराग्याच्या झोळींत भिक्षा घातली. समर्थांनी आपल्या वहिनीस ओळखलें. पण तिला हा 'बैरागी' कसा समजून येणार ? समर्थांनीं झोळी खालीं ठेवली, आणि ते ओट्यावर बसून राहिले. पार्वती दचकली आणि ओरडली "अगबाई, हा बैरागी इथंच जेठा मारून बसला कीं !" समर्थांनीं उत्तर दिलें, " हा बैरागी आतां हलणार नाहीं. इथंच राहणार आहे." हे शब्द आंत माजघरांत ऐकूं गेले. राणूबाईचें मातृवात्सल्य खड-बडून जागें झालें. चोवीस वर्षांपूर्वीचा आवाज तिला ओळखीचा वाटला. म्हातारी खरडत खरडत उंबरठ्यांतून बाहेर आली आणि तिनें विचारलें " कोण ग ? माझ्या नारायणासारखा आवाज वाटतो." खंगलेल्या आईचें दर्शन होतांच समर्थ पुढें झाले. त्यांनीं आईच्या पायांवर मस्तक ठेवून म्हटलें, " होय आई, हा तुझाच नारायण, आहे."

"खरंच ? कीं हें स्वप्न आहे ? खरंच माझा नारायण ?" राणूबाई उद्गारली. घडल्या प्रकारावर तिचा विश्वासहि बसत नव्हता. तिनें त्याला चांचपून पाहिलें. ते भरदार दंड, त्या जटा, तो भिक्षेकऱ्याचा वेष ! सर्व कांहीं म्हातारीनें जाणलें, आणि ती बोलली, "नारायणा, तूंच बरं कां. पण आतां हें तुझें रूप पाहायला दृष्टि कुठयं मला. मी अभागिनी आहें. मला पुत्राचें दर्शन नाहीं होणार वाटतं ?" समर्थांनीं आपला दिव्य हात आईच्या अंगावरून डोळयांवरून फिरविला. चोवीस वर्षांत आलेलें वार्धक्य जणूं तिच्या अंगचें नाहींसें झालें. तिला नवी दृष्टि आली. आपल्या मुलाला ती कडकडून भेटली. आपादमस्तकपर्यंत ती कितीतरी वेळां तिच्या नारायणाकडे पाहात होती. दोघांच्याहि डोळयांतून अश्रुधारा वहात होत्या. इतक्यांत श्रेष्ठ आले. म्हातारी उद्गारली, "गंगाधर, हा पहा नारायण आला माझा. आला नारायण पहाना, तूं."



घरांत आनंदीआनंद झाला. मातेची झालेली अवस्था पाहून समर्थांना फार वाईट वाटलें. पण 'देवाच्या सख्यत्वासाठीं । पडाव्या जिवलगांसी

तुटी ' हें तत्त्व त्यांनी ओळखलें होतें. त्यांनी देवाचें सख्यत्व जोडलें होतें. आतां कांहीं काळ आईच्या सेवेंत घालविण्याचें त्यांनी ठरविलें. दिवस मोठ्या मजेंत चालले होते. एकदां रात्री गप्पा निघतां निघतां राणूबाई बोलली, "अरे नारायणा, इतकी वर्षे तू भटकत राहिलास. कांही निरोप चिठ्ठी तरी पाठवावयाची होतीस ना ? आम्ही किती काळजीत होतों ! माझे रडून रडून डोळे गेले तरी तुझा पत्ता नाही. मला वाटलें कुठें विहिरीत पडलास, की नदीत वाहून गेलास, की वाघानें खाल्लें, का कोण्या भुतानें पछाडलें तुला ?"

"हा हा आई खरच मला भूत लागल होतं. चोविस वर्ष तें मानगुटीवर होतें...अजूनहि." समर्थ उत्तर देत होते.

"खरं ? कोणत रे भूत ?" भाबडेपणाने आईने विचारलें.

आई तें भूत फार भयंकर आहे. सांगू त्या भुताबद्दल हकीगत ? पहा—

होतें वैकुंठाच्या कोनी । शिरलें अयोध्याभुवनी ।
लागे कौसल्येचे स्तनी । तेंची भूतगे माय ।

आई, या भुतानें ताटिकेचा वध केला, अहल्येचा उद्धार केला, पित्याच्या आज्ञेवरून तें बारा वर्षे अरण्यात राहिले. रावणादिकांचा त्याने नायनाट केला. आई,

नाव त्याचें रामराय । सर्व भूताचें हृदय ।
रामदास नित्य गाय । तेंचि भूत गे माय ॥—

आई कौतुकानें ऐकत होती. तिनें नारायणाला जवळ घेतलें. त्याला कुरवाळलें आणि म्हटलें "नारायणा, आता नाहीना सोडून जाणार मला ?" समर्थांनी उत्तर दिलें, "आई तू म्हणेपर्यंत मी तुझ्याजवळ राहीन."

आणि खरोखरच समर्थ आईसाठी कांही दिवस जांबेंत राहिले. त्याच वर्षीच्या चातुर्मासांत भागवतांतील कथा आपल्या पावन झालेल्या वाणीनें समर्थांनी आईस ऐकविल्या. तिसऱ्या स्कधांत कपिल महामुनींचें आख्यान आहे तें त्यांनी आईस विस्तारानें सांगितलें. आपल्या आईस कपिलांनी भक्तिज्ञानाचा बोध केला ही कथा निवडून समर्थांनीं चातुर्य दाखविलें.

त्यांना लोकांचा उद्धार तर करावयाचा होताच; पण तत्पूर्वी आपल्या जन्मदात्या आईसहि अमृतबोधाचा ठेवा देणें आवश्यक होतें. भागवतांतील ही दिव्य कथा ऐकून राणूबाईस धन्यता वाटली. पुत्राचें कर्तृत्व आणि त्याच्यापुढील कार्याचें महत्त्व त्या म्हातारीनें बरोबर ओळखलें. प्रसन्न झालेल्या राणूबाईच्या डोळ्यांत घळघळा अश्रू ओघळूं लागले. ती बोलली,

" नारायणा, माझ्या कुशीत येऊन तू माझाच उद्धार केला आहेस. तू खरोखर अवतारी पुरुष आहेस. तुझ्या उपदेशाने माझा मायापाश तुटून गेला. जगाचा उद्धार करणें हें तुझें पवित्र कर्तव्य आहे. जा, तू, तुझें कार्य करीत रहा. मी आतां दुःखशोकातीत झालें आहें. माझा तुला आशीर्वाद आहे. "

समर्थांना मातेची आज्ञा मिळाली. आतां ते जांबेस कशाला थांबतात ? त्यांच्या डोळ्यांसमोर हजारों कार्ये उभी होती. त्यांनी मातृदेवतेच्या चरणीं मस्तक ठेविलें. दोघांनाहि पुनः गहिवर दाटला. मातेचा आशीर्वाद घेऊन समर्थ जगाच्या कल्याणासाठी बाहेर पडले.

लोकोद्धाराच्या आणि सांप्रदायाच्या कार्यांत मग्न असतांनासुद्धा श्रीसमर्थ मधून मधून आईस येऊन भेटत असत. सन १६५४ मध्यें जांबेस येऊन आईला भेट घेतल्याचा उल्लेख सापडतो. राणूबाईचें निधन ज्येष्ठ शु. ३ शके १५७७ (सन १६५५) या दिवशी झालें. यावेळी समर्थ राणूबाई-जवळ होते. तिचा जीव नारायणाला पुनः एकदां शेवटचा पाहून घ्यावा म्हणून घुटमळत होता. नारायण योग्य वेळेस जांबेस येऊन पोंचला. राणू-बाईनी त्याच्या अंगावरून हात फिरविला. " नारायणा, तुम्ही उभयतांनी माझ्या पोटी येऊन कुळाचा उद्धार केलांत," राणूबाईनें सांगितलें. समर्थ व श्रेष्ठ या दोनहि मुलांना गहिवरून आलें. समर्थ आईस बोलले, "आई, हा सर्व तुझ्याच पुण्याईचा प्रताप." दोनहि लौकिकवान् पुत्रांच्या सन्निध असतांना राणूबाईनें प्राण सोडला.

समर्थांची मातृभक्ति श्रेष्ठ प्रकारची होती. त्यांच्या ग्रंथावरून या

त्यांच्या मातृभक्तीची साक्ष अनेक वेळां पटून येते. दासबोधाच्या तिसऱ्या दशकांतील चौथ्या समासांत त्यांनी आईच्या प्रेमाचें वर्णन केलें आहे.

" पुत्र वैभवहीन भिकारी। माता तैसाचि अंगीकारी।
दगदगला देखोनि अतरी। त्याच्या दुःखें दुःखवें ॥ ३७ ॥
प्रपंच विचारें पाहतां। हें सकळ जोडे, न जोडे माता।
हें शरीर जयेकरितां। निर्माण जालें ॥ ३८ ॥
म्हणोनि धन्य धन्य ते प्रपंची जन। जे मायबापांचें भजन।
करिती, न करिती मन। निष्ठुर जिवलगांसी ॥ ४१ ॥

रामदासांची स्तोत्रेंहि बहारीची आहेत. एके ठिकाणी आईचा महिमा वर्णन करतांना ते लिहितातः

" नागिवें उघडें लोळे। हागे वोकी अव्हासव्हा।
तैशास नेटकें दावी। लेववी नेसवी सदा ॥
मातेचा कळवळा मोठा। लोभासी तूळणा नसे।
वोळखी सोडिली बाळें। तिला तो साडितां नये ॥

या भवानीच्या स्तुतीत रामदासांनी मातेचा गौरव केला आहे.

पंढरपुरास असतांना समर्थांनी आपल्या मातेस एक सुदर पत्र लिहिलें; तें पुढीलप्रमाणें आहे—

सकळ गुणांचा निधि। निर्गुणाची कार्यसिद्धि।
विवेकाची दृढबुद्धि। तुझेनि गुणे ॥ १ ॥
तूं भवसिंधूचें तारूं। तूं भक्तांचा आधारु।
तूं अनाथाचे अवसरु। वैष्णवी माया ॥ २ ॥
तूं भावार्थाची जननी। तू विरक्तांस जीवनी।
तूं परमार्थाची खाणी। भजनशीळ ॥ ३ ॥
तूं सर्व सुखांची मूस। तूं आनदरत्नांची मांदूस। (पेटी)
तुझेनि चुकती सायास। संसारीचें ॥ ४ ॥
भावार्थाचें आगरू। प्रबळ शांतीचा सागरू।
पाहतां उपमे मेरू। तोही उणा ॥ ५ ॥

# श्रीछत्रपति शिवाजीमहाराज

( १६३०–१६८० )

चारपांच शतकेंपर्यंत पारतंत्र्यांत असणाऱ्या देशास आपल्या अतुल सामर्थ्यानें स्वतंत्र करून हिंदवी स्वराज्याची प्राणप्रतिष्ठा करणारे एकमेव थोर युगपुरुष म्हणून शिवरायाचें नांव इतिहासांत सदैव तळपत राहील. अलौकिक बुद्धिमत्ता, असामान्य राजकारणपटुत्व, हिंदुधर्माबद्दल विलक्षण अभिमान, आदर्श नीतिमत्ता, स्वातंत्र्याची अनावर हौस, इत्यादि अनेक गुणांचा संग्रह शिवाजी राजांच्यामध्यें झाला होता. अविंधमय होऊं पाहणाऱ्या महाराष्ट्रास संजीवनी मंत्र दिल्याप्रमाणें चैतन्ययुक्त करून महाराजांनीं अद्वितीय पराक्रम केला. स्वराज्यसंस्थापक म्हणून त्याचा गौरव नेहमीं केला जातो. देश, देवधर्म व लोक यांना यवनांच्या मगरमिठींतून सोडविण्याची कामगिरी कांहीं सोपी नव्हती. परंतु शिवाजी राजांच्या अद्वितीय सामर्थ्यामुळें महाराष्ट्रावर कित्येक दिवसांनंतर स्वातंत्र्यसूर्य उगवला व त्याच्या जीवनदायी प्रकाशामुळें प्रत्येकास नवें चैतन्य प्राप्त झालें.

# ४ : : राजमाता जिजाबाई

## ( १५९७ – १६७४ )

अफझलखानाच्या वधामुळें आदिलशहा घाबरून गेला होता. सिद्दी जौहर यास सलाबतखान हा किताब देऊन त्यानें शिवाजीच्या पारिपत्याची तयारी चालविली होती. बापाच्या वधाचा सूड घेण्यासाठी म्हणून अफझल-खानाचा मुलगा फाझलखान हाहि शिवाजी विरुद्ध उठला. जजिऱ्याचे सिद्दी आणि वाडीचे सावत यांनीहि उठाव केला. अशा बिकट प्रसंगी पन्हाळगडी राहून शत्रूशी लढण्याचें श्रीशिवरायांनीं ठरविलें. आसपासच्या प्रदेशांत मुसलमानांनी बराच धुमाकूळ घातला होता. सर्व लोक घाबरून गेले, व्यापाऱ्याची त्रेधा उडाली, सासवड लुटलें गेलें, सुप्यास वेढा पडला, पुण्यावर हल्ला झाला, इदापूर काबीज केले गेलें, आणि अशा बिकट प्रसंगी राजपुत्र शिवराय क्रोधायमान होऊन पन्हाळगडावरून सिद्दी जोहाराशी लढा देत होते. नेताजी पालकर आणि हिलाल यांच्याकडे बाहेरील शत्रूस थोपवून धरण्याचे कार्य होते. तें त्यांच्याकडून नीटसे पार पडलें नाही आणि पन्हाळगडचा वेढा तर अगदी निकरावर आल्याचें पाहून यावेळीं राजगडी असणारी जिजाबाई स्वतःच युद्धावर जाण्याची भाषा बोलूं लागली. तिच्या ठिकाणी वीररसाचा सचार झाला. नेताजी आणि हिलाल हे राजगडच्या पायथ्याशी शिवपट्टणास तिला भेटले. अप-राध्याप्रमाणें भीतभीत त्यांनी जिजाबाईस प्रणाम केला, त्यावर त्या दोघांना उद्देशून तिनें आवेशानें भाषण केलें:

"युद्धोत्साह धारण करणारा माझा तो बाह्य प्राण तिकडे पन्हाळगडावर शत्रूंकडून चोहों बाजूनी वेढला गेला आहे, आणि तुम्ही, सगळी लाज गुडा-ळून ठेवून, आपल्या धन्यास संकटांत टाकून शत्रूच्या भीतीने येथें परतला आहांत, हें आश्चर्य नव्हे ? त्या माझ्या एकुलत्या एक पुत्रास स्वतः सोड-विण्याचा मी प्रयत्न करीन आणि जौहाराचें मुंडकें आज युद्धांतून घेऊन येईन. ज्याच्यावांचून या दिशा मला मोठ्या अरण्याप्रमाणें शून्य दिसत आहेत त्या सिंहास, त्या माझ्या पराक्रमी बाळास मी परत आणीन...

विष्णूचा अवतार ( अंश ) असा तो माझा पुत्र जर मला क्षणभर दिसणार नाही, तर मी प्राण सोडीन...मी स्वतः त्या शत्रु जौहराचा समाचार घेतें.''[1]

जिजाबाईच्या अंगी प्रगटलेला हा वीरत्वाचा आवेश शिवरायांच्या आईस शोभण्यासारखाच आहे. वरील भाषणांत प्रगट झालेले 'विष्णूचा अवतार असा तो माझा पुत्र' हे शब्दहि फार महत्त्वाचे आहेत. शिवरायांच्या कुळांत अशा प्रकारची दैवी श्रद्धा फार पूर्वीपासून चालत आलेली होती. आज आपण या गोष्टींना फार महत्त्व देत नसलों तरी 'कुलांत शंभू अवतार घेणार आहे' या भावनेवर फार मोठें कार्य शिवाजीच्या पूर्वजांनीं केलें आहे. शिवाजीचें भोसले घराणें चितोडच्या सूर्यवंशी शिसोदे रजपुतांपासूनच निर्माण झालें होतें. शिवाजीचे वडील शहाजी, आणि शहाजीचे वडील मालोजी भोसले. या मालोजीचा जन्म सन १५५२ मध्यें झाला. बंधू विठोजीसह मालोजी सवड सापडेल त्याप्रमाणें निजामशहाची नोकरी करी. फलटणच्या जगपाळ निंबाळकरांची बहीण उमाबा ही मालोजीची बायको होती. यांना पुष्कळ दिवस पुत्रसतान नव्हतें. अहंमदनगरजवळ शहाशरीफ नांवाचा एक मुसलमान साधुपुरुष रहात होता; त्याच्या कृपाप्रसादानें उमाब्वास दोन मुलगे झाले. त्यांचीं नांवें शहाजी व शरीफजी अशी ठेवण्यांत आली. सन १५९४ मध्यें शहाजीचा जन्म झाला.

याच वेळी सिंदखेड येथें लखुजी जाधव नावाचे एक प्रतिष्ठित सरदार निजामशाहींत नांवारूपास आले होते. यांच्या पदरी मालोजी होता. अर्थात् सिंदखेडचे देशमुख सरदार आणि मालोजी भोसले याच्यांत प्रतिष्ठेच्या दृष्टीनें फार अतर होतें. तरीपण छोट्या शहाजीवर जाधवरावांचा फार लोभ होता. त्यांना जिजाई नावाची एक कन्या होती. तिचें वय शहाजीपेक्षां दोन अडीच वर्षांनी लहान होतें. जाधवरावांच्या घरी सारखें येणें-जाणें असल्यानें जिजाबाई-शहाजीचें सर्वच कौतुक करीत. लखूजी जाधवरावांनी एकदां या दोघांच्या लग्नासबधी बोलणें काढलें. मालोजी तरी कसें अमान्य करणार? परंतु जाधवरावांच्या स्त्रीस हा संबंध मान्य झाला नाहीं. ती आपल्या

१ कवीन्द्र परमानन्दकृत 'शिवभारत' अध्याय २६; १२–१७.

पतीस बोलली, " सोयरीक या मुलीस करणें तें मातबर, मनसबदार पाहून करणें; हें कन्या बहूत समारभें, ज्याचे घरी फार दौलत, वस्त्रें, अलंकार तेथें द्यावयाची. " बायकोच्या या बोलण्यावर जाधवरावांनी उत्तर दिलें: " आम्ही स्वाभाविकपणें बोललों. वचन कांही गुतलें नाहीं. " याप्रकारें लग्नाची गोष्ट फिसकटू लागली. मालोजीस निरोप गेला की " शरीर संबंधाची गोष्ट आपण बोलूं नये. आमचे घरांत कोणाचे विचारास येत नाही. ब्रह्मसूत्र असेल तेथें घडेल. "

या घडलेल्या प्रकारामुळें मालोजीस फार वाईट वाटलें. आपण फारच हलक्या दर्जावर आहोंत, मूळचे श्रेष्ठ कुलातील, पण आज प्रतिष्ठा नाहीं, म्हणून हा अपमान भोगावा लागत आहे. आपण गरीब म्हणून ही अवहेलना आज होत आहे. क्षणभर मालोजीच्या चित्तांत उद्वेग निर्माण झाला. परंतु याच उद्वेगांतून त्याच्या कुळाचें वैभव निर्माण झालें. धार्मिक आणि दैवी श्रद्धेवर मालोजीनें अचाट साहस करून आपली योग्यता वाढविली. आपल्या कुळांत प्रत्यक्ष श्रीशभू अवतार घेणार आहे ही त्याची श्रद्धा यामुळेंच दृढ झाली. खिन्न होऊन मालोजी आपल्या शेतमळ्यावर जाऊन बसला. " सोयरिक दुसऱ्यास देणार तेव्हां पुरुषार्थच काय उरला ? याहून मरण श्रेष्ठ " असा एक ओझरता विचार त्याच्या मनांत येऊन गेला. अशा समयी श्रीभगवती देवीनें दर्शन दिलें आणि ती मालोजीस बोलली, मी " मी देवी आहें. तूं भय पावूं नको. सावध हो. तुझा भाव शुद्ध पाहून तुजवर कृपा करावी म्हणोन प्रसन्न होऊन दृश्य जालों. तुझे कुळीं श्रीसांब अंशेकरून अवतार घेऊन धर्मस्थापना करणार. देवब्राह्मणास पीडा झाली आहे. ती दूर झाली पाहिजे. याजकरतां तुजवर प्रसन्न जालों. " देवीच्या या साक्षात्कारानें मालोजी धीट बनला. याच देवीच्या कृपेनें त्याला द्रव्याचा ठेवा सांपडला. त्याचा उपयोग पदरी लष्कर उभारण्यांत आणि लोकोपयोगी कामें करण्यांत मालोजीनें केला. वेरूळचें घृष्णेश्वराचें जुनें मंदिर मोडकळीस आलें होतें त्याचा जीर्णोद्धार मालोजीनें केला. त्याचप्रमाणें शभू महादेवाच्या डोंगरावर शिंगणापूर येथें यात्रेकरूंसाठी विस्तीर्ण तलाव बांधून पाण्याची सोब

मालोजीनें करून दिली. आतां मालोजीचें नाव सर्वत्र गाजू लागले. निजामशहानेहि मालोजीस पंचहजारी मनसब, 'राजे' असा किताब देऊन जाधवरावांच्या तोडीचे बनविले. शेवटी निजामशहाच्याच मध्यस्थीनें हें गाजलेलें लग्न सन १६०५ च्या डिसेंबरमध्यें मोठ्या थाटानें पार पडले.

अशा तऱ्हेनें सोयरिक जमली तरी सासऱ्याजांवयाचें कधीच पटलें नाही. त्यामुळें जिजाबाईस संकटमय परिस्थितीतच दिवस कठावे लागले. जिजाबाईस चार मुलें झाली परंतु ती एकामागून एक मरण पावली. पांचव्या मुलाचें नांव संभाजी असे होते. निजामशहाच्या दरबारी या वेळी शहाजीचें वजन खूपच वाढले होतें. संभाजीच्या बारशास स्वतः मूर्तिजा बुऱ्हाणशहा हजर होता. त्यानें आनंदप्रदर्शनासाठी शहाजीस आणखी जहागीरं दिली. पुढे बादशहा वारल्यावर निजामशाहीचा सर्वच कारभार, शहाजीच्या हाती आला. शहाजीचा हा उत्कर्ष अर्थातच त्याचे श्वशूर जाधवराव याना पसंत पडला नाही. लखूजी जाधवरावाच्या मनांत द्वेषानें मूळ धरलें, आणि शहाजीच्या पारिपत्यासाठी त्यानी यत्न चालविले. त्या वेळी उत्तरेकडील मोगल बादशहा शहाजहान निजामशाही बुडवू पहात होता. जाधवराव त्यास जाऊन मिळाले. आणि मोगलांच्या मदतीनें निजामशाही बुडविण्यास सिद्ध झाले. शहाजीने जिवापाड पराक्रम करून निजामशाही बचविण्याचा प्रयत्न केला. कल्याणजवळील माहुलीच्या किल्ल्यांत, दुसरा मुर्तिजा निजामशहा, त्याची आई, शहाजी, जिजाबाई इत्यादि मंडळी अडकून पडली होती. मोगलाच्या वतीने जाधवरावानी किल्ल्यास वेढा दिला. सहा महिनेपर्यंत मोठ्या हिंमतीने शहाजीने शत्रूस तोंड दिलें, परंतु पुढें दैवगति विचित्र झाली. जाधवरावांनी प्रत्यक्ष निजामच्या आईची भेट घेऊन तिच्या मनांत शहाजीविरुद्ध भरविलें. आतां प्रत्यक्ष बडी साहेबीणच फितूर झाल्यावर तेथून पळ काढण्याखेरीज शहाजीस गत्यंतर नव्हतें. तीनचार वर्षांचा मुलगा संभाजी आणि जिजाबाई यांच्यासह शहाजी राजे तेथून निसटले.

जिजाबाई यावेळी सात महिन्यांची गरोदर होती. या धावपळीत घोड्यावर बसून तिलाही रपेट मारावी लागे. मोंगलातर्फे लखूजी

जाधवराव माागून पाठलाग करीत होते. जिजाईला या विलक्षण घोडदौडीचा त्रास होऊ लागला. जुन्नरपाशी आल्यावर तिच्या पोटांत दुखूं लागलें. चालणें अशक्य झाल्यावर तिनें शहाजीला विनविलें: "महाराज, शत्रू तर नजीक येऊन ठेपला आहे: आणि मी तर अशी अवघडलेली ! आपण पुढें निघून जावें. माझी काळजी मुळींच करू नये. माझी सर्व सोय येथें होईल."

शहाजीचे एक स्नेही श्रीनिवासराव म्हणून होते. त्यांच्या मदतीनें जिजाबाई शिवनेरीच्या किल्ल्यात राहूं लागली. मागून येणाऱ्या जाधवरावाना समजलें की आपली पोरगी येथल्याच किल्ल्यावर आहे. त्यांनीं जिजाईची भेट घेतली आणि तिची समजूत काढण्याचा प्रयत्न केला.

"पोरी, असे जिवाचे हाल कां करून घेतेस? सिंदखेडला चल. तुझी सारी व्यवस्था करतों."

नवऱ्याविरुद्ध उठलेल्या बापास जिजाबाईने बाणेदारपणानें उत्तर दिलें, "बाबा, नवऱ्याच्या सगतींतील दिवस वाईट कसे? मी आतां भोसल्यांच्या घरची बायको. माझें लग्न झालें तेव्हाच जाधवाचा सबध तुटला. तेथला ऐषआराम काय कामाचा? आणि बाबा, भोसल्यांचा सूड घेणार आहांत तुम्ही? ही पहा त्यांचीच पत्नी तुमच्यापुढे उभी आहे. त्याच भोसल्यांचा कुलततू माझ्या पोटांत वाढत आहे. करा नायनाट हाती आलेल्यांचा...!"

जाधवराव वरमून गेले, तरी पुनः दटावून बोललेच, "तोंड आटोप जिजे, मोठा दिमाख दाखवतेस पळपुट्या नवऱ्याचा...!"

नवऱ्याचा अपमान मानी जिजाईस कसा सहन होणार? तिनें खाड-दिशी उत्तर दिले:

"बाबा, आपण मला जन्म दिलांत, पण कट्टे दुष्मन बनलात माझे, सूडाची ज्योत पेटली आहे तुमच्या हृदयांत. तुमचा पोटचा गोळाहि त्यांत जळून राख होत आहे. आवरा, तुमचें काम आवरा. मोंगलाकडून तुम्हाला बक्षिसी मिळेल. भोसल्यांची गरोदर बायको पकडून देण्याचा मोठा पराक्रम तुम्ही केलांत तर लौकिक वाढेल तुमचा...!"

मुलीच्या उत्तरानें जाधवराव लज्जित झाले. घोड्याला टांच मारून त्यांनी पुढचा मार्ग सुधारला.

जिजाई शिवनेरी किल्ल्यावर दिवस काढीत होती तरी भोंतालच्या परिस्थितीचें ज्ञान तिला चांगलेंच होतें. तिची ईश्वरावर मोठी श्रद्धा होती. चोहोंकडे मुसलमानांनी चालविलेली दंगल, हिंदु धर्मीयांचा छळ, देवब्राह्मणांची विटंबना, गाईची हत्या या सर्व गोष्टी तिच्या डोळ्यांसमोर उभ्या राहिल्या. तशांत आणखीहि कांही विलक्षण घडामोडी घडल्या. जाधवराव मोंगलास फितूर होतात म्हणून निजामशहानें त्यांना दौलताबादेच्या किल्ल्यावर भेटीस बोलावलें. त्यावेळी मोठीच दंगल झाली. तीत स्वतः लखूजी जाधवराव, त्यांचे दोन पुत्र अचलोजी व रघूजी आणि नातू यशवंतराव इतके पुरुष ठार झाले. जिजाबाईचा माहेरचा आधार सर्वस्वीं तुटला. शहाजी निजामशाही बुडवू पाहणाऱ्या आदिलशाहीचा नोकर बनला. या सर्व प्रसंगांचा परिणाम जिजाबाईच्या मनावर तीव्रतेनें झाला. शिवनेरीच्या शिवाई देवीला तिनें नवस केला, "देवी, या सर्व संकटांतून देशाला मुक्त करणारा पराक्रमी पुत्र मला होऊ दे. मी त्याला तुझें नांव ठेवीन." जिजाबाईची ही तीव्र इच्छा देवीच्या कानांवर निःसंशय गेली असली पाहिजे: महापराक्रमी आणि स्वराज्य-संस्थापक अशा पुत्रास प्रसवणाऱ्या मातेची इच्छा तरी कोणती असणार ? जिजाबाईला कोणते डोहाळे लागले होते ? शिवभारतकारांनी फार सुंदर वर्णन या प्रसंगीं केलें आहे.

"तेजोमय गर्भ धारण करणाऱ्या त्या जाधवरावांच्या कन्येनें सर्व पृथ्वीला शोभा आणली...हत्तीवर, वाघावर आणि गडांवर आरोहण करावें; शुभ्र छत्राखालीं सुवर्णसिंहासनावर स्थिर बसावें, उंच उंच झेंडा फडकवावा, सुंदर चौऱ्या ढाळून घ्याव्या, दुंदुभिध्वनि ऐकावा, धनुष्यबाण, भाला, तरवार आणि चिलखत हीं धारण करून लढाया जिंकाव्यात, गड हस्तगत करावेत, विजयश्री मिळवावी, मोठमोठीं दानें करावीं, धर्मस्थापना करावी"[१]– असे डोहाळे जिजाईला होत होते.

(१) कवीन्द्र परमानन्दकृत 'शिवभारत' अध्याय ६; ११–१८.

शेवटीं समय प्राप्त होतांच.शके १५५१ च्या फाल्गुन व. ३ रोजीं (दि. १९ फेब्रुवारी १६३० ) जिजाबाई प्रसूत होऊन तिला पुत्ररत्न झालें. परमानन्द कवीनें कौतुकाने वर्णन केलें आहे, "त्याचें लावण्य अपार, वर्ण सुवर्णासारखा, शरीर निरोगी, मान अत्यंत सुदर व खांदे उंच होते; त्याच्या कपाळावर सुदर कुतलाग्रें पडलेली असल्यामुळें तें मोहक दिसत होतें. त्याचे नेत्र कमळाप्रमाणें, सुदर नासिका ताज्या पळसाच्या पुष्पासारखी, मुख स्वभावतःच हसरें, स्वर मेघासारखा गंभीर, छाती विशाल, आणि बाहू मोठे होते."

यावेळी शहाजी राजे विजापुरास होते. त्यांना हें शुभवर्तमान कळविण्यांत आलें. शुभवार्ता घेऊन येणारास त्यांनी सोन्याची कडी, वस्त्रें दिली. शिवनेरीच्या देवीच्या कृपेनें पुत्र झाला म्हणून पुत्राचें नांव 'शिवाजी' ठेवलें.

शिवाजीच्या रक्षणाची आणि शिक्षणाची सर्व जबाबदारी जिजाबाईवर होती. यापुढील काळांत तिचें आणि शहाजींचें फारसें जमलें नाहीं. दरम्यानच्या काळात शहाजीनें तुकाईशी दुसरें लग्न केलें. तरीपण आपल्या चित्तांत मत्सराला थारा न देतां जिजाईनें सर्व लक्ष शिवाजीकडे लावलें. त्याच्या मनावर योग्य असे सस्कार करून त्याला लहान वयांतच देशकालपरिस्थितीची जाणीव करून देण्याचें महत् कार्य तिनें केलें. आपल्या आयुष्याच्या उत्तरार्धात शहाजी राजे तंजावरकडे कारभारांत होते. आणि इकडे पुण्यास आजच्या शनिवारवाड्याच्या आग्नेय कोपऱ्यावर 'लाल बाग' म्हणून वाडा होता त्यांत जिजाबाई व दादोजी कोंडदेव यांच्या नजरेखाली शिवाजीचें शिक्षण चालू झालें. स्वदेश व स्वधर्म यांबद्दलची प्रीति शिवाजीच्या मनांत त्याच्या मातेनेंच निर्माण केली. जिजाबाई मोठी कर्तव्यदक्ष, निश्चयी आणि धर्माभिमानी माता होती. रामायण-महाभारत यांतील वीररसात्मक गोष्टी सांगून तिनें शिवाजीचें मन तयार केलें. घोड्यावर बसणें, तिरंदाजी करणें, पट्टा फिरविणें, तलवार गाजविणें इत्यादि युद्धोपयोगी शिक्षणहि शिवाजीस मिळत राहिलें. दिवसें दिवस वाढत जाणारें शिवाजीचें तेज पाहून 'आपल्या कुलांत शभू अवतार घेणार, शककर्ता राजा निर्माण होणार' हा तिचा विश्वास बळावत चालला.

शिवरायांच्या पुढल्या सर्व गौरवपूर्ण कार्यास जिजाबाईची शिकवण कारणीभूत झाली आहे. तिनें शिवाजीच्या मनावर पक्कें बिंबविलें होते की, "आपण वडिलानी मेळविले ते खाऊन राहणे योग्य नाही. आपण हिंदू. दाक्षिण देश सर्व म्लेछांनी ग्रासला. देव, ब्राह्मण, क्षेत्रें, गाई यांस बहूत पीडा जाली. धर्म अगदी बुडाला. तेव्हा धर्मरक्षणार्थ प्राणहि वेचून धर्म रक्षावा, आणि आपले पराक्रमानें नवीन दोलत संपादावी, तें अन्न भक्षून फौज व लोक जमा करावे आणि वडिली मिळविले तेंहि रक्षून नवे साधन करावे हेंच याच कुळात जन्मल्याचें सार्थक व श्रेयस्कर. देवावर व दैवावर भार घालून, पुरुषप्रयत्न अवलंबन करावा. त्यास दैव जसे जसें साह्य होईल तसे तसे अधिक करीत जावे, मग देव परिणामास नेण्यास समर्थ आहे." शिवाजीच्या सर्व पराक्रमाचें हेच सूत्र म्हणून सांगता येईल.

पुढें शिवाजी वयात आल्यावर त्याचा स्वराज्याचा उद्योग सुरू झाला. दरवेळी जिजाबाईची मसलत शिवाजीस उपयोगी पडे. तोरणा किल्ला सन १६४६ साली हस्तगत झाला. राजगड किल्ल्याची उभारणी झाली. चाकण, पुरंदर, रोहिडा, लोहगड, राजमाची इत्यादि किल्ले शिवरायांनी ताब्यांत घेतले. आदिलशहाच्या पोटात धस्स झाले. शिवाजीच्या या धुंडाव्यास शहाजी साह्य करतो की काय? याच शंकेनें आदिलशहानें शहाजीस कैद केलें. शिवाजीस मोठेंच संकट पडलें. आपल्या वडिलांवर केवढें संकट आपणामुळें! जिजाबाईनें यावेळा पुत्रास सुचविलें, "राज्य साधावें, धर्माचें व गोब्राह्मणांचें रक्षण करावे असा हेतु धरिला आहे तो योग्य आहे. देवावर भार घालून चालावे....थोरले महाराज पडले दूर देशी. त्यांस इकडील वर्तमान माहीत नाही. शरण जावयाचें हें मला बिलकूल पसंत नाही. दुसरी कांही युक्ति शोधून थोरल्या महाराजाची सुटका करा." पुढे दिल्लीच्या बादशहाशी संधान बांधून शिवाजीनें शहाजीची सुटका केली ही हकीगत प्रसिद्धच आहे.

विजापुराहून अफझलखान शिवाजीवर चालून आला. हा प्रसंग फारच कठीण होता. प्राणाशी गांठ होती. भेटीपूर्वी शिवराय मातोश्रीच्या दर्श-

नास आले. जिजाबाईस गहिंवरून आलें. अफझलखानानें तिच्या पहिल्या मुलास, संभाजीस ठार मारिलें होतें, ही गोष्ट तिच्या ध्यानांत होती. वंदन करीत असणाऱ्या शिवबास तिनें आशीर्वाद दिला. "वडिल भाऊ संभाजी यांस दग्यानीं मारविलें त्याचें उसनें घेतों." असें म्हणून शिवाजी निघाला, आणि अतुल सावधगिरीनें त्यानें अफझलखानाचा फडशा पाडला. जिजाईचा आनंद गगनांत मावेना. विजयी पुत्राला पोटाशी धरून माता बोलली, "बाळ, सावधपणाची शर्थ केलीस!" प्रतापगडावर मोटा आनंदोत्सव झाला. आपल्या पुत्राच्या पराक्रमाचा पोवाडा तयार करण्यास जिजाबाईनें त्या वेळच्या अज्ञानदास नांवाच्या शाहिरास सांगितलें, आणि त्याला इनाम म्हणून एक शेर सोनें व एक घोडा दिला.

शिवाजीच्या सर्व लोकोत्तर कृत्यांत जिजाबाईचा सबंध दिसून येतो. अफझलखानाच्या वधानंतर शिवाजी पन्हाळगडीं मोंगलांच्या वेढ्यांत सांपडला. त्यावेळीं नेताजी पालकर आणि हिलाल यांना उद्देशून जिजाईनें केलेलें वीररसयुक्त भाषण प्रारंभीच दिलें आहे.

शहाजीचें आणि जिजाईचें पुढील काळांत फारसें जमलें नाहीं तरी तिची पतिभक्ति यत्किंचित्‌हि कमी नव्हती. सन १६६४ च्या बेदनूरच्या स्वारीत शहाजीराजांना अपघाती मरण आलें. जिजाबाईस अपार शोक झाला. तिनें सती जाण्याची तयारी केली. शिवरायांचा धीर सुटला, त्यांनीं आईचे पाय घट्ट धरून ठेवले. कारभाऱ्यांनी जिजाबाईस विनंति केली: "आपण अग्निप्रवेश केल्यावर महाराज कांही प्राण ठेवणार नाहींत. संपादिलेलें राज्य आजच लयास जाण्याचा प्रसंग आला. या गोष्टीकडे नजर देऊन महाराजांस ओसंगी घ्यावें. मन घट्ट करून रहावे. हेका धरून सती गेलांत तर वंशक्षय केला ही अपकीर्ति जगांत होईल." येवढें झाल्यावर पुत्रप्रेमास्तव जिजाबाईनें आपला बेत रद्द केला. पुढें दहा वर्षें-पर्यंत शिवाजीचें चढतें वैभव तिनें पाहिलें. सन १६७४ साली धर्म-शास्त्रोक्त पद्धतीनें शिवाजीस राज्याभिषेक झाला. रायगडावर अपूर्व सोहळा निर्माण होऊन मराठ्यांच्या इतिहासांतील एक सोनेरी पान लिहिलें गेलें. पुत्राचें हें कौतुक पाहून, आपला मुलगा छत्रपती झाला, देवीची वाणी

खरी झाली हें पाहून जिजाबाईस धन्यता वाटली, आणि या मंगल प्रसंगानंतर बाराच दिवसांच्या आंत या थोर माऊलीचा अंत रायगडाखालीं पाचाड या गांवी दि. १७।६।१६७४ रोजी झाला!

जिजाबाई मानी, निश्चयी, स्वतंत्र विचाराची व धाडसी होती. शहाजी कर्नाटकांत असताना पुण्याच्या जहागिरीची सर्व व्यवस्था ती पाहात होती. तिला राजकारणहि कळत असे. तिनें दिलेले न्यायनिवाडे प्रसिद्ध आहेत. स्वजनाचा समाचार ती जातीनें घेत असे. विठोजी हैबत देशमूख, सिलीमकर याची मुलगी, खंडेराव गोमाजी नाईक पानसंबळ याचे मुलास दिली. परंतु या लग्नास लागणारा पैसा विठोजी देशमूख याचेजवळ नव्हता; तेव्हां जिजाबाईनें त्यास लिहिलें, "तुम्हावरी मेहरबानी करून लुगड्याबद्दल होन पंचवीस व ऐन जिन्नस सामान पाचशें माणसांचा असे बाक्षिस दिलें असे. सुखें येऊन अलबत्ता लग्न सिद्ध करणें."

राजकारणांत आणि धर्मकारणांतहि तिची दृष्टि आधुनिकास शोभेल अशी होती. फलटणचा बजाजी नाईक निंबाळकर हा पातशाहाच्या सांगण्यावरून मुसलमान झाला होता. जिजाईनें त्याला हिंदुधर्मात घेण्याची व्यवस्था करून शिवाजीची मुलगी सखूबाई ही त्याचा मुलगा महादजी निंबाळकर यास दिली.

'वीरसू' 'राजमाता' ही विशेषणें जिजाबाईला शोभण्यासारखीच आहेत. 'जिजाऊसारखे कन्यारत्न श्रीनें पैदा केलें' असा उल्लेख बखरकार तिचा करीत असतात.

'शिवराज प्रशस्ती' नांवाचें एक छोटें संस्कृत काव्य त्या गागाभट्टानें रचिलें आहे. जिजाबाई संबंधी त्यांत त्यानें म्हटलें आहेः

कादंबिनीव जनजीवनदानहेतुः । सौदामिनीव सकलारिविनाशनाय ॥
आलंबिनी भवति राजगिरेरिदानी । जीजाभिधा जयति शहाकुटुंबिनी सा ॥

[ मेघमालेप्रमाणें लोकांच्या जीवनास उपयुक्त होणाऱ्या, विद्युल्लतेप्रमाणें सर्व शत्रूंचा नाश करणाऱ्या, राजगडावर सर्वांचें आश्रयस्थान होणाऱ्या या शहाजीच्या पत्नीचा, जिजाबाईचा विजय असो. ]

# थोरले बाजीराव पेशवे

( १७००–१७४० )

श्रीशिवरायांनीं स्थापन केलेल्या स्वराज्याचें साम्राज्यात रूपांतर करणारे बाजीराव पेशवे यांचें नांव अनेक दृष्टींनीं गौरवास्पद आहे. हे मूर्तिमंत पराक्रमाचा पुतळाच असून यांचा सबंध जन्म युद्ध करण्यांतच गेला. मराठ्यांच्या राजकारणास उत्तरेकडे विस्तृत क्षेत्र निर्माण झालें होतें. भोपाळ, पालखेड, साखरखेडले, मुंगीशेगाव इत्यादि अनेक ठिकाणीं यांनीं निजामाचा पराभव केला. आपल्या छोट्याशा आयुष्यांत यांनीं शिपाईगिरीची आणि राजकारणाची शर्थ केली. महंमद बंगश, गिरिधर बहादर, सरबुलंदखान इत्यादिसारख्या उत्तरेंतील शत्रूंनाहि यांनीं पराभूत केले होते. लढवय्या पेशवा म्हणून बाजीरावाची योग्यता फार मोठी आहे.

यांचे धाकटे बंधु चिमाजी आप्पा हेहि मोठे पराक्रमी होते. वसईच्या लढाईमुळें चिमाजी आप्पाचें नाव अजरामर झालें आहे. शूर, धोरणी, मनमिळावू आणि नीतिमान् म्हणून यांचा लौकिक होता. सिद्दीसाताचा पराभव यांनींच केला.

## ५ : : तीर्थस्वरूप राधाबाई पेशवे—

( — १७५३ )

१४-१२-१७३५ श्री

"मातुश्रीबाई यासी—

अपत्ये चिमाजीनें कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपरी. तुमच्या आशीर्वादेकरून सुखरूप असो. विशेष तुमच्या आशीर्वादें आम्हास काये नुन्य केले आहे ? तुमच्या समाधानापेक्षा आम्हांस दैवत दुसरें नाहीं. तुम्ही यात्रा करावयास जातां, देवधर्म तीर्थ करावयास चिरंजीवाचा पायगोवा (मुलाची तुम्हास अडचण होईल.) यैसे आहे. आपण तुमचा निरोप घेतला ते समई आपण पाय उतारा तुमचे पालखी समागमें घटकाभर येऊन मग निरोप घेऊन यावें यैसें होतें, परंतु ते समई चित्तात आलें नाहीं. यामुळें चित्तांत अलीकडे आलियावर हळहळ वाटली. आपलें समाधानपूर्वक आसीर्वाद पत्र आलें म्हणजे चित्तातील हळहळ दूर होईल हे विनंती—"[1]

पहिले बाजीराव पेशवे आणि चिमाजीआप्पा हे दोघे सख्खे बंधु. वरील सुंदर पत्रांत चिमाजीआप्पानें आपल्या आईबद्दलच्या भावना व्यक्त केल्या आहेत. आई काशीयात्रेला निघाली आहे. तिच्या पालखीबरोबर निरोप देण्यासाठी म्हणून जाणें आवश्यक होतें; परतु तें हुकलें, त्यामुळें चिमाजीच्या चित्तात हुरहूर निर्माण झाली आहे. आणि ती हुरहूर नाहीशी होण्याचा एकच मार्ग, तो म्हणजे मातुश्रींचें समाधानपूर्वक आशीर्वादाचें पत्र. यासाठी चिमाजीनें आईला मनापासून विनंति केली आहे. चिमाजीआप्पा व बाजीराव याचें सर्व शिक्षण त्यांची आई, राधाबाई हिचे हाताखालीच झालें. ही मोठी कर्तबगार बाई असून खाजगी व्यवहार आणि राजकारण यांतहि तिची गति उत्तम असे. या काळांतील कर्तबगार स्त्रिया म्हणजे छत्रपती शाहूमहाराजाची विरूबाई, सेनापती खंडेराव दाभाडे यांची स्त्री उमाबाई आणि पेशवे बंधूची आई राधाबाई. आपल्या

(१) पे. द. खंड ९—११.

दोनहि मुलांना अनेकवार उत्कृष्ट प्रकारची सल्लामसलत तिनें दिली आहे. पेशवे घराण्याचा लौकिक वाढण्यास तिचेच कर्तृत्व कारणीभूत झालें आहे.

पेशव्याचें मूळ घराणें कोंकणांतील श्रीवर्धन येथील. बाळाजी विश्वनाथ भट कर्तबगारी दाखवून नाव कमवण्यासाठी कोंकणांतील हबशाच्या त्रासास कंटाळून सन १६७९ च्या सुमारास देशावर आला, तेव्हां शाहू राजानें त्याला हाताशी धरलें; आणि आपल्या सेनानायकत्वाच्या जोरावर तो मुख्य प्रधान बनला. मराठ्यांच्या राज्याचा विस्तार दिल्लीपर्यंत करण्याचा पायंडा बाळाजी विश्वनाथानें पाडला. या मुत्सद्दी आणि धोरणी सेनापतीची बायको राधाबाई. ही नेवरे येथील बर्वे घराण्यांतील असून अत्यत हुशार म्हणून नांवाजलेली होती. तिला लिहितां वाचतां चांगलें येत असे. राधाबाईची कामगिरी द्विविध प्रकारची आहे. पहिली, आपल्या कुटुंबांतील मुलांना, नातवांना, सुनांना वळण लावून देणें, कुटुंबातील सर्व व्यवस्था जातीनें पाहणें ही होय; आणि दुसरी म्हणजे सामाजिक किंवा राजकीय विषयांतील.

घरांतील मुलांबाळांचें योग्य तें शिक्षण तिनें आपल्या देखरेखीखाली केलें. साधी राहणी, काटक शरीरप्रकृति आणि साहसाची प्रवृत्ति हे जे गुण पुढें पेशव्यांच्या घराण्यांत विशेषत्वानें दिसतात त्यांचा उगम राधाबाईमध्यें सांपडतो. सर्व प्रकारच्या मसलतीत तिची मुलें तिचा सल्ला विचारीत आणि तीहि अचूक असें मार्गदर्शन करी. मराठे सरदारांचें व पेशव्यांचें सामर्थ्य वाढीस लागलें आहे असें समजून हैद्राबादचा निजाम वचकून होता. 'आमची व रायांची भेट व्हावी, समक्ष भेटून अतःकरणांतील सर्व संशय दूर व्हावेत' यासाठी निजामानें शाहूकडे सारखें सधान बांधलें होतें. बाजीराव—निजाम यांच्या भेटीचा विषय ज्याच्या त्याच्या तोंडी होताच. अनेक जिव्हाळ्याच्या माणसांना व खुद्द राधाबाईसहि ही भेट पसंत नव्हतीसें दिसतें. नानासाहेबांची मामी, शिऊबाई चासकर राधाबाईस लिहिते, " राऊ तांब्राच्या भेटीस जातात म्हणून ऐकिलें, तर भेटीस न जावें हा विचार सर्वांचा आहे. तुम्ही म्हणाला की पेशवाई पदाचा

महिमा म्हटला की छत्रपतीची आज्ञा प्रमाण; परंतु प्रस्तुतचा प्रकार राजकीय नाही. तांब्रानें छत्रपतीस दोन कोट रुपये देऊ केले आहेत, या लोभास्तव ते यांस पाठवितात असें सर्वतोमुखी आहे. यास्तव याचें जाणें न होय तें करावें. कदाचित् जाणें भागच असेल तर चिमाजी अप्पाची फौज जवळ आणविणें, दोघे एकत्र होऊन मग काय तो विचार करणें. उतावळी करून एकट्यांस जाऊं न देणें–"[1] राधाबाईचेंहि हेंच मत होतें. निजाम कपटी आहे. शाहूस दोन कोट रुपये देऊन बाजीरावचा कांटा दूर करण्याचा घाट त्यानें घातला आहे असा प्रवाद सर्वत्र पसरलेला दिसतो. खुद्द राधाबाईनेंहि भेट न घेण्याचाच सल्ला बाजीरावास दिला आहे. ती लिहिते, " राजश्री रंभाजी निंबाळकर व तुरुजखान याची भेट जालियानतर भेटीचा मनसुबा मोडला तर बहुतच आहे. नाहीतर तुम्ही विचार करून भेटीचा मनसबा मोडे ते गोष्ट करणें."[2] राधाबाईच्या या उपदेशास बाजीरावानें यावेळी तरी फारसें महत्त्व दिलें नाहीं. पंढरपूर-करमाळा या वाटेवर माजग नदीच्या काठी रोहेरामेश्वर येथें दोघांच्या भेटी झाल्या. 'पहिले भेटीचे समयी रायास एक हत्ती व एक मोत्यांची जोडी, दोन घोडे, ७ पर्चे वस्त्रें व एक पजा ऐसें दिल्हे " भेट यशस्वी रीतीनें पार पडल्यावर अर्थातच राधाबाईस मनस्वी आनंद झाला. " प्रत्यक्ष छत्रपतीस व मातोश्रीस आनदाच्या कोटी उत्पन्न झाल्या."

राधाबाईच्या चरित्रांतील सर्वांत महत्त्वाची बाब म्हणजे तिनें केलेली काशीयात्रा. या यात्रेंत तिचे झालेले सत्कारसमारभ पाहिले म्हणजे पेशव्यांचें सामर्थ्य व त्यांचा लौकिक यांची साक्ष पटते. राधाबाईची काशीयात्रा ही एक खाजगी धार्मिक बाब उरलेली नव्हती. तिला एक स्वतंत्र राजकीय महत्त्व प्राप्त झालें होतें. तिच्या यात्रेचा काळ जवळजवळ पंधरा महिन्यांचा होता. १४ फेब्रुवारी १७३५ रोजी पुण्याहून निघून उदेपुर, नाथद्वार, जयपूर, मथुरा, वृंदावन, कुरुक्षेत्र, प्रयाग, इत्यादि तीर्थयात्रा करून ती काशी येथें १७ ऑक्टोबर १७३५ रोजी आली; आणि नंतर ती गया, बुंदेलखड, सागर या मार्गे मे महिन्यांत पुण्यास येऊन पोंचली. उत्तर

(१) पे. द. खंड ३०–९०, (२) पे. द. खंड ९–७.

हिंदुस्थानांत हा काळ अत्यंत आणीबाणीचा होता. माळवा प्रांत ताब्यांत घेण्यासाठी पिलाजी जाधव, शिंदे, होळकर आदि सरदार करून प्रयत्न करीत होते, आणि बादशहाचे उमराव पन्नास हजार फौजेनिशी त्यांच्याशीं सामना देण्यास सिद्ध होते. या धामधुमीच्या काळांत प्रवास करणें फारच धोक्याचें होतें. राधाबाईचा व्यवस्थापक बाबूजी नाईक, बऱ्हाणपूरहून चिमाजी आप्पास लिहितो " आम्ही अविवेकें निघालों. पंथ दूर. राजकीय वर्तमान की परस्पर युद्ध होतें. एखादा वाईट प्रसग आला तर घरास तरी सुरक्षित कसें यावें! बुंदेलखंडांतून जावें तर कमर्दीखानचा शह, सवाईजी-कडे जावें तों ते दूर गेले. लोकापवादाकरितां उगाच साहस करावें तर स्वामीचें नांव थोर, स्वामी पुण्यवान आहेत तों चिंता नाही.—"[1]

अशा कठीण प्रसंगी राधाबाईची काशीयात्रा चालली होती. बरोबर पेशव्यांकडील जबाबदार माणूस असा कोणी नव्हता. चिमाजी आप्पाचा मुलगा सदाशिवरावभाऊ यानें बरोबर असावें असा राधाबाईचा विचार होता, परतु त्यास नुकतेंच पांचवें वर्ष लागलें होते. एवढ्या लहान मुलास बरोबर घेणें युक्त वाटलें नाही. बाबूजी नाईक याचा बधु आबाजी यास राधाबाईची कन्या भिऊबाई ही दिली होती. तो स्वतः आणि बाबूजी नाईक या बंधूंनी राधाबाईची व्यवस्था उत्तम ठेविली होती.

उत्तर हिंदुस्थानांतील रजपुत राजे आणि मुसलमान सत्ताधीश या सर्वांनी राधाबाईचा सत्कार फार चागल्या प्रकारें केला. बाजीरावासारख्या पराक्रमी पुरुषाची मातोश्री उत्तरेंत येत आहे. तिची पायधूळ आपल्याहि घरी लागावी अशी ज्याची त्याची इच्छा होती. राधाबाईचा प्रेमळ आशीर्वाद आपणासहि मिळावा अशी अनेक पत्रे पुण्यास येत असत. जागजागीं तिचा सन्मान होऊन वस्त्रालकारांच्या अनेक भेटी तिला आल्या. मराठ्यां-बद्दल आदराची आणि कौतुकाची भावना उत्तरेंतहि होती याची प्रचीति यावरून येण्यासारखी आहे.

(१) पे. द. खंड १४–२१.

उदेपूर येथील सत्काराचें वर्णन बाबूजी नाईक यांनी १८ मे १७३५ च्या पत्रांत केलें आहे. "बडवाईहून वैशाख शु.७ शुक्रवारीं निघोन वैशाख शु. १० स उदेपूरास आलों. ८–१० दिवस राणाजींनी आपले संनिध ठेऊन मातोश्रींचा सन्मान उत्तम प्रकारें केला. महालांत मातोश्रीस नेली. राणाजी मातोश्रींचे दर्शनास महालांत गेले. मोत्यांची माळ १ पदक १ व हातचे सोन्याचे चुडे किमत तो माफक परंतु जनांत बहुमान हेच गोष्ट थोर आहे. हत्ती छावा एक, ५००० रुपये खर्चास;बिहारीदास (उदेपूरचा दिवाण) यांनी १००० एक हजार नजर केली."[1]–रजपुतांना मराठ्यांबद्दल केवढा अभिमान वाटे याचा उत्कृष्ट पुरावा म्हणून राधाबाईचा ठिकठिकाणी होणारा सन्मान सांगतां येईल. उदेपूरहून नाथद्वार करून बाई जयपुरास गेली. " मातुःश्रीबाईस बादशहाची दस्तकें त्रिस्थळी यात्रा करून सुखरूप नर्मदापार करून द्यावें ऐसी दिल्ही असून दोन सरदार व हजार स्वार बरोबर दिले आहेत. जागजागां उमरावांनी अहेर, मेजवान्या, जवाहीर, हत्तीघोडे देऊन गौरवून आपापल्या हद्दीतून पोहोचवून देतात. द्रव्यहि खर्चास देतात."[2] असा प्रवासाचा वृत्तांत पत्रांतून सांपडतो.

पातशहा, अहमदखान बंगश इत्यादींनीहि मातुःश्रींचा सत्कार केला. यासंबंधी जयपूरहून पेशव्यांचा वकील सदाशिव बल्लाळ कुटे लिहितो, "मातुःश्री राधाबाईचें आगमन आषाढ आरंभी जयनगरास जालें. बाबूजी नाईक घेऊन आले. तेथून निघणें दसरा जाहालिया उपर होईल. मातुःश्री पुण्यवान याजकरितां सर्व गोष्ट नीट पडली. पुढेंहि त्यांचेच पुण्यानें गोष्टी होतील. स्वामींचें (बाजीरावाचें) अदृष्ट विचित्र आहे, तेणें करून चिंता वाटत नाही. यात्रा सुखरूप होऊन आपले स्थलास जातील. राय नारायणदासजी यांस महाराजाधिराज सवाईनी मातुःश्री समागमें शेवट पावेतों दिल्हे. त्यांचे व्याही राय हरप्रसाद महमदखान बंगशाचे दिवाण. स्वामींचें (बाजीरावाचें) अगत्य सर्वांस. तेच घडीस आम्हांस यमुनापार उतरून नबाब बंगशाचे भेटीस घेऊन गेले. जाऊन नबाबाची भेट घेतली. बहुत संतोषी जाले की, रायांनी आम्हास स्मरण करून पत्र लिहिलें व आमचे

(१) पे. द. खंड ९–१२. (२) पे. द. खंड १४–३९.

भरवंसियावर मातुःश्रीस पाठविलें. त्यांची मातुःश्री व आमची दोन नाहीत. तेच घडीस आपले तालुक्यापावेतों फौजादारांस ताकिदा लिहून पाठविल्या आणि मातुःश्रीचे सेवेसी वर्तमान सांगोन विजयादशमीचे मूहुर्तें यमूनापार उतरून दिली आणि हरप्रसाद दिवाणाबरोबर हजार रुपये नगद व वस्त्रें पांचसाशेंची बादली मातुःश्रीकारणें पाठविली. सवाई जयसिंग बोलले की रायांशी माझा अकृत्रिम स्नेह आहे. उदेपूरच्या राणाजींनीं सामंतसिंग वकील स्वामिसेवेसी पुण्यास पाठविला आहे. स्वामीच्या नांवाचर सर्व गर्भगळित आहेत."[१] बाजीरावाचा वचक उत्तरेंत किती होता, आणि जो तो बाजीरावाचा स्नेह कसा सपादीत करीत होता हें सदर पत्रावरून स्पष्ट होतें.

राधाबाई यात्रेंत होती तेव्हां तिचा पराक्रमी पुत्र बाजीराव बादशहाविरुद्ध स्वारीची तयारी करण्यास गुंतलेला होता. याच गडबडींत आईच्या पत्राची तहान त्यास वारंवार लागे. एखाद्या वेळीं पत्रें वेळेवर पोंहचत नसत. एका पत्रांत बाजीराव आपल्या आईस लिहितोः "तीर्थरूप मातोश्री बाई वडिलांचे सेवेशी—अपत्यें बाजीरायें साष्टांग नमस्कार विनति उपरी. बहुत दिवस वडिलांकडील आसीर्वादपत्र येऊन वर्तमान कळत नाही यास्तव चित्त साक्षेपित असे. तरी निरंतर आसीर्वादपत्री कुशलार्थ लेखन करून आपण कोठें आहेत, काये वर्तमान, माघारी बुदेल खडांत आलीत न आलीत तें वृत्त साकल्य लिहिलें पाहिजे. यात्रा लौकर करून माघारीं बुंधेलखंडांत येणें....मनसुबियाचे दिवस निघोन जातात तरी तुम्ही सत्वर येणे. दिलीकडील राजकारण दृढतर लागलें आहे....तदोतर पुढें जो विचार करणें तो करून आपणांसहि लिहून पाठऊन. मूख्य गोष्ट पृथ्वीपती आदिकरून श्रेह इच्छितात. आपणांस कलावें म्हणोन लिहिलें असे. लोभ असों दीजे हे विनती—"[२] या पत्रांत उल्लेखलेल्या बुदेलखंडाचा राजा छत्रसाल याचा आणि बाजीराव यांचा संबध प्रसिद्धच आहे. छत्रसाल बुंदेले याचें वय झालें होतें. तशांत बंगशखाननें त्याच्यावर स्वारी केली. तेव्हां रक्षणासाठीं छत्रसालनें दक्षिणेंतील बाजीरावाचें साह्य मागितलें.

(१) पे. द. खड ३०–१३४. (२) पे. द. खड ९–५१.

"जो गति ग्राह गजेंद्रकी सो गति जानहुं आज
बाजी, जात बुन्देल की राखो बाजी लाज"

या विनंतीस अनुसरून बाजीरावानें बंगशचा सपूर्ण मोड केलेला होता. हा उपकार छत्रसाल विसरणार कसा ? पण राधाबाई उत्तरेंत जाण्यापूर्वीच छत्रसालचें निधन झालें होतें. परंतु छत्रसालाच्या पुत्राकडून राधाबाईचा सन्मान उत्तम प्रकारें झाला.

राधाबाईच्या या यात्रेचें आणखी एका दृष्टीनें महत्त्व आहे. उत्तरेंत मुसलमानांचें राज्य जारी होऊन हिंदुधर्माचा छळ होत होता, तेव्हां काशीसारखी पवित्र स्थळें सोडवून धर्म स्थापना दृढ करावी हा हेतु बाळाजी विश्वनाथापासूनचा होता; आणि हाच सूर अनेक वेळां राधाबाईच्या पत्रांवरून निघतो. काशी येथें घाट बांधण्याची, अन्नछत्रें, वर्षासनें, अग्निहोत्रें वगैरे चालविण्याची सूचना अनेकदां बाजीरावाकडे झालेली दिसते. सारांश दक्षिण देशचे ऐक्य उत्तरेंत स्थापित करण्यास राधाबाईसारख्या कर्तबगार स्त्रीची काशीयात्रा कारणीभूत झालेली आहे. राधाबाई १७३६ च्या मे महिन्यांत परत पुण्यास आली. १ जून १७३६ रोजी मावंदे थाटांत झालें.

राधाबाई आपल्या मुलांनातवडांवर तत्परतेनें लक्ष ठेवीत असे. तिनें आपल्या सुनेस, म्हणजे बाजीरावाचे बायकोस लिहिलें आहेः "चिरजीव सौभाग्यवती कासीबाई यांसी प्रति मातुश्री राधाबाई अशीर्वाद उपरी—बहुत दिवस तुम्हाकडील वर्तमान कळों येत नाही, तरी सबिस्तर लेहून पाठवणें. आपणास व चिरंजीव बालास जतन करणें जनार्दनास जतन करणें."[१] राधाबाईनें चिमाजीस लिहिलेल्या एका पत्रांत मुलांसाठी कांही खेळणीं पाठवावीत म्हणून लिहिलें आहे. ती म्हणते, "मुलास खेलावयास जिनस बाहुली हस्तीदती व काचेची यैसी उत्तम असतील ती पाठऊन देणें. पूर्वी तांदूल व पोहे जिनस पाठविला त्याचा जाब आला नाही. तर जिनसाचा जाब पाठवून देणें, तांदूल पाटणी व पोहे वगैरे जिनसाचे प्रयोजन असिले तर लेहून पाठवणें त्याप्र।। पाठऊन देऊन. आवलकठीचे प्रयोजन असिले तर लेहून पाठविणें त्याप्र।। पाठऊन देऊ. हा आसीर्वाद."[२]

(१) १ पे. द. खंड ९–७५. (२) पे. द. खंड ९–२४.

राधाबाईनें पुत्रवात्सल्यानें चिमाजीची चौकशी केली आहे! पेशवे दप्तराच्या ९ व्या खंडांत अशी कौटुंबिक जिव्हाळ्याची पत्रें अनेक आहेत. आईच्या धर्मकृत्यांची सर्व व्यवस्था बाजीराव व चिमाजीआप्पा स्वतः करीत असत. एका पत्रांत चिमाजीनें समुद्रस्नानासाठी म्हणून राधाबाईस बोलाविलें आहे. तो लिहितो, "मातुश्रीबाई समुद्रस्नान करणें आहे म्हणून पावसालां बोलली होती. या करितां अमवाशे आलीकडे च्यार दिवस येथें पावणे म्हणजे अमावाशेस स्नान करून स्वार होऊन जाणें. मातुश्रीच्या विचारें यावेसें असलें तर रवानगी करणें. सौभाग्यवती मातुश्री कासीबाई वहिनीचा पाय बरा जाला असला आणि त्यांच्या विचारे समुद्र स्नानास यावेसे असले तर त्यासहि रवाना करणे. ती आली म्हणजे जनार्दन, रघुनाथ, सदाशिव त्रिवर्गहि येतील–"[१]

राधाबाईच्या डोळ्यांदेखत तिचे दोनहि कर्ते पुत्र मृत्यु पावले. लढवय्या पेशवा म्हणून बाजीरावाची ख्याती होती. युद्धगिरीवर असतांनाच नर्मदातीरी रावेरखेडी येथें २२ एप्रिल १७४० रोजी बाजीरावाचा अत झाला; आणि आठदहा महिन्यांत चिमाजीवरहि काळानें घाला घातला. चिमाजी अजारी झाला तेव्हा आधींच पोळलेला राधाबाईचा जीव घाबरा झाला. तिनें ब्रह्मेंद्रस्वामीस लिहिलें, "चिरजीव राजश्री आप्पास ब्रहस्पतिवारी सप्तमीस दहा घटका रात्रीस वेथा बहुत जहाली. उपरांत सावध झाल्यावर प्रातःकाली दोन घटका रात्रीस पालखीत घालून घरास आणिले. नालगुताची वेथा जाहली म्हणोन उपाय करीत आहों व वैद्यहि पांचसात आहेत. तेहि उपाय करितात. स्वामींनी ईश्वरापाशी संकट घालून चिरजीवास आरोग्य होय तो उपाय करणार स्वामी समर्थ आहेत."[१] पण कोणत्याच उपायाचा परिणाम न होतां १७ डिसेंबर १७४० रोजी चिमाजी आप्पांचें निधन झालें. अगदी थोड्या अवधीत दोनहि कर्तबगार पुत्रांचा शेवट राधाबाईनें पाहिला.

या दोनहि मुलांची राधाबाईवर जशी श्रद्धा होती, त्याप्रमाणेंच आंग्रे, निंबाळकर, जाधव इत्यादि वजनदार मराठे सरदारहि तिला फार मान

(१) पे. द. खंड ९–१९. (१) ब्रह्मेंद्रस्वामी चरित्र ले. २५.

देत असत. कान्होजी आंग्र्यांनी राधाबाईस लिहिले आहे--"गंगा-भागिरथी समान राधाबाई यांसी--प्रीतिपूर्वक कान्होजी आंगरे सरखेल दंडवत उपरी. साप्रत तुमचें पत्र येत नाही ऐसे तर नसावें. आपलें सर्वदा कुशल वर्तमान लिहीत जाणें--"[१] पिलाजी जाधव सक्रातीचा तिळगूळ राधाबाईकडे पाठविताना म्हणतो, "तीर्थस्वरूप मातुःश्री राधाबाई वडिलांचे सेवेसी अपत्यसमान जाधवराव सा., दडवत. वडिलांची आज्ञा घेऊन स्वार जाहालो तदारभ्य पत्र घेऊन परामर्ष जाला नाही; तेणें करून चित्त सापेक्षित आहे. तरी वडिली कृपा करून आशीर्वाद पत्र पाठवून सांभाल करीत असले पाहिजे. यानतर, वडिलांकारणें सक्रमणाची तिलशर्करा पाठविली आहे. अगिकार करून उत्तर पाठविले पाहिजे."[२] याप्रमाणें राधाबाई वजनदार मराठे सरदारांचीहि जणू 'माता' च होती.

राजकीय व्यवहारात राधाबाई जसे लक्ष घाली त्याचप्रमाणे कांही सामाजिक प्रश्नातहि तिने जातीने चौकशी केली आहे. पुण्यांत गोविद हरी पटवर्धन यांच्या घरी एक बटीक होती. शोध करतां असें समजून आलें कीं ती महारीण आहे ! सर्व ब्राह्मण मडळीत एकच गोधळ उडाला.पटवर्धनावर बाळित पडून त्यास मोठीच अडचण निर्माण झाली. यावेळी नानासाहेब पेशवे, राधाबाईचा नातू साताऱ्याकडे होता. तेव्हां स्वतः राधाबाईने या प्रसगी पुढाकार घेतला. ब्राह्मणाना जमवून त्यांना समजावून सागितलें. पटवर्धन मडळीस प्रायश्चित्त देववून हे प्रकरण तिने मिटविलें.

याप्रकारे राधाबाईची बुद्धि सर्वगामी होती. पेशवे फिरतीवर असतांना पुण्यांतील बहुतेक व्यवहार राधाबाईच पहात असे. शहराची बसाहत, बदोबस्त, उत्सव समारभ, दानधर्म, अहेर, बाळतविडे, घाट--मदिरें यांची बांधकामें इत्यादि अनेक कामांत राधाबाई लक्ष पुरवीत असल्यानें दोनहि पेशव्यांना, बाजीरावास व नानासाहेबास सवड सांपडून त्यांना मुलखगिरीकडे लक्ष पुरविणे शक्य झाले.

शके १६७३ च्या श्रावण शुद्ध ४ रोजी नानासाहेब पेशव्यांनी पुणें येथें राधाबाईची रुपयांनी तुला केली असल्याचा उल्लेख सांपडतो.

राधाबाईचा मृत्यु दि. १९-४-१७५३ या दिवशी झाला.

(१) पे. द. खंड ९--५२. (२) पे. द. खंड ९--७९.

# ईश्वरचंद्र विद्यासागर

(१८२०–१९०१)

बंगालमधील सुप्रसिद्ध संस्कृत पंडित आणि विधवाविवाहाच्या कायद्याचे जनक म्हणून ईश्वरचंद्र विद्यासागरांचा लौकिक आहे. प्रारंभींच्या आयुष्यांत शिक्षकापासून प्राचार्याच्या जागेपर्यंत यांनीं कामें केलीं. फार मोठे समाजसुधारक म्हणूनहि यांची प्रसिद्धी आहे. कमालीची मातृभक्ति, साधेपणा, निर्भयता आणि नीतिमत्ता या गुणांमुळें त्यांची छाप सर्वांवर पडे. शैक्षणिक क्षेत्रांतहि यांनीं महनीय अशी कामगिरी केली. स्त्रीशिक्षणासाठीं यांनीं अनेक मुलींच्या शाळा सुरू केल्या. याच्या परोपकारी वृत्तीमुळें यांचा स्वभाव सर्वांना आवडला होता. एका विनोदी माणसानें म्हटलें आहे, "परमेश्वर अनेक बंगाली माणसें निर्माण करीत होता. मध्येंच त्यानें ईश्वरचंद्र हा पुरुष उत्पन्न केला." या विधानांत ईश्वरचंद्राचें असामान्यत्व स्पष्ट झालें आहे. संस्कृतचे गाढे पंडित म्हणूनहि ईश्वरचंद्रांस फार मोठा मान होता.

## ६ : : भगवतीदेवी वंद्योपाध्याय

वाटेनें मुसळधार पाऊस कोसळत होता, मेघ गडगडत होते, विजा चमकत होत्या. सार्‍या दिशा धुद होऊन गेल्यामुळें सर्वत्र अंधारून आलें होतें. रस्त्यांतून गुढग्याएवढें पाणी सांचले होते; आणि याच पावसांत एक पंचवीससव्वीस वर्षाचा उमदा तरुण झपाझपा पावलें टाकीत चालला होता. अंगावरील कपडे सर्व भिजून गेले होते, पण चेहर्‍यावर सात्विक भाव तरळत होता. त्याच्या मनांत सारखें येत होतें,...घरी वेळेवर पोंचावयास पाहिजे. आई डोळे लावून बसली असेल आपणाकडे. तिला जेवणखाण सुद्धां सुचत नसेल. आपण लौकर गाठलें पाहिजे घर. पण हा कोसळणारा पाऊस !...ऊः प्रत्यक्ष वरच्या साहेबाला नाही जुमानलें तें काय या साध्या पावसास आपण डरणार ?

अगदी खरी खरी गोष्ट. कलकत्त्याच्या फोर्टवुल्यम कॉलेजमध्यें इंग्रजी व हिंदी शिकविणारा हा तरुण पोरगा. घरी धाकट्या भावाचें विवाहकार्य निघालें आहे जरूर निघून यावें असा आईचा निरोप होता. विद्यालयाचे प्रमुख मार्शल नांवाचे युरोपियन होते. रजा देण्याचे त्यांनी नाकारलें; आणि इकडे तर आईचा तातडीचा निरोप; काय करावे या विचारांत कांही क्षण गेले आणि शेवटी मातृभक्तीचा जय झाला. राजिनामा लाग-लीच देऊन हा मातृवीर कलकत्ता सोडून आपल्या गांवी येण्यास निघाला. झाल्या प्रसंगानें चित्तांत वादळ उठलें होतें आणि भोंवतीहि निसर्ग प्रक्षुब्ध झाला होता. आभाळाची जणू शिवण उसवून सर्वत्र पाणीच पाणी झालें होतें. हवेंत कमालीचा गारठा उत्पन्न झाला होता. शेवटीं हा तरुण गडी दामोदर नदीकांठी येऊन पोंहोचला. नदी दुथडी भरून वहात होती. आधीच ही दामोदर नदी धोका देणारी, आणि त्यातून आज तर बेफाम होऊन गर्जना करीत होती. मूर्तिमत रौद्र रूपांत दामोदर नदी वहात असलेली पाहून हा मातृभक्त तरुण जरा शकित झाला. सध्याकाळ झाल्यामुळें काळोख साहजिकच वाढला. जवळपास धीरासाठी कोणीहि नाहीं. होडीवाले होते, परतु या भयंकर प्रसगांत कोण आपला जीव

धोक्यांत घालणार ? वाटेल तेवढे पैसे देण्याचें तरुणानें कबूल केलें; पण त्याचा उपयोग झाला नाही. आईची आज्ञा पालन करणें तर अत्यंत अगत्याचें होतें. तरुणानें मनाशी धडा केला आणि प्राणाची फिकीर न करतां 'माताजी की जय' म्हणून त्यानें भरधांवपणें वाहणाऱ्या नदींत उडी टोकली. त्याचें सामर्थ्य दाडगें होतें. शरीरयष्टि पिळदार आणि लोखंडाप्रमाणें कणखर होती. पोहण्यांत तर तो पहिल्या प्रतीचा होता, आणि अधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्याच्या पाठीवर आईचा आशीर्वाद होता. पाण्याच्या प्रवाहाशी बेधडकपणें झुज करतां करतां तरुण वीरानें पलीकडचा काठ गांठला ! आतां घर अगदी थोड्या अंतरावर होतें. तरुणानें पळत-पळतच घर गांठलें. दारावर थाप मारून 'आई ! मी आलोंय आई' हांक मारली. आईनें लगबगीनें दरवाजा उघडला आणि या अवेळी येणाऱ्या व भिजून चिंब झालेल्या मुलाकडे पाहून ती उद्गारली:

"कोण, ईश्वर तू ?"

"हो, आई मी ईश्वरचंद्र. तूं बोलावलें होतेंस ना ?" आईच्या पायाला स्पर्श करीत ईश्वरानें उत्तर दिलें.

संकटांतून बचावलेल्या मुलाची हकीगत ऐकून आईस केवढी धन्यता वाटली असेल ! परमेश्वराचे आभार मानून ती सर्वांना म्हणाली, 'माझा मुलगा आल्याखेरीज राहणार नाही, हें तर मी सारखें म्हणत होतें. तुम्हांला खरें वाटलें नाही. माझीच थट्टा करीत होतां तुम्ही सर्वजण. परंतु माझा ईश्वर मला माहीत आहे. इतर लोकांना काय समजणार तो !"

आईचा विश्वास मुलावर होता; आणि मुलाची श्रद्धा आईवर होती !

या छोट्या परतु धैर्याच्या प्रसगी मातृभक्तीचे उदाहरण बंगाललाच नव्हे तर सर्व भारताला घालून देणारा तरुण वीर म्हणजे बंगालमधील सुप्रसिद्ध पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर: आणि त्यांची आई म्हणजे भगवती-देवी वंद्योपाध्याय.

पश्चिम बगालमधील हुगळी जिल्ह्यांत वीरसिंह या गांवी ठाकुरदास नांवाचे एक दरिद्री गृहस्थ रहात असत. आपल्या भावांना आणि म्हाताऱ्या आईला सुख देण्यासाठी ठाकुरदासांनी खूप प्रयत्न केले, परंतु

दारिद्य कांहीं दूर हटलें नाही. ठाकुरदासांच्या पत्नीचें नांव भगवतीदेवी. ही एका पंडिताची मुलगी होती. तिच्या वडिलांचें नांव सर्व बंगालमध्यें विद्वान् वैय्याकरणी म्हणून प्रसिद्ध होतें. ही स्त्री मोठी कर्तबगार असून आर्य स्त्रीचा उत्कृष्ट नमुना होती. दारिद्र्यांतच ससोरे करून तिनें आपल्या मुलांना फार चांगलें वळण लावलें. तिच्या बाणेदार वागणुकीची छाप तिच्या मुलांवरहि पडली. याच अलौकिक स्त्रीच्या पोटी इ. स. १८२० मध्यें ईश्वरचंद्र विद्यासागर यांचा जन्म झाला. ईश्वरचद्रास वडिलाकडून स्वतंत्र वृत्ति, धैर्य, दीर्घोद्योग आणि विद्वत्ता या गुणाचा लाभ झाला; आणि विद्या शील यांची जोड आईमुळें त्यांच्या या गुणांस मिळाली. पुढें ईश्वरचंद्रास दयासागर ही पदवी मिळाली. मातेचें परोपकारित्वच याच गोष्टीस कारणीभूत झालें. विद्येबद्दल भगवतीदेवीस उच्च अभिरुचि होती. मुलांच्या शिक्षणाकडे तिनें चांगलें लक्ष पुरविलें. ग्रहणशक्ति आणि बुद्धिसामर्थ्य या बाबतीत ईश्वरचंद्र सर्वापेक्षां शाळेंत वरचढ होते. वयाच्या तीन वर्षांच्या आतच ईश्वरनें पाठशाळेतील अभ्यास संपविला. शिक्षकानी मातेपाशी उद्‌गार काढले, "मुलगा अलौकिक बुद्धीचा आहे. पुढील शिक्षणासाठी कलकत्त्यास पाठवा." मातेस धन्यता वाटली. परतु घरांत तर अठरा विश्वे दारिद्र्य. मुलाचें शिक्षण कसें करावें ? परतु काही झालें तरी मुलास विद्यासपन्न करावयाचें असा विचार ठाकुरदास याचाहि होता.

आठ वर्षांच्या ईश्वरचंद्रास घेऊन ठाकुरदास कलकत्त्यास निघाले. ईश्वरनें मातृदेवतेस वंदन केलें आणि पुढील अभ्यासासाठी वडिलाबरोबर तो कलकत्त्याची वाट चालू लागला. रस्त्यानें मैलांचे दगड होते. त्यांवर इंग्रजी आंकडे होते. ईश्वरनें एका दगडावर 19 हा आंकडा पाहून वडिलांना विचारलें 'हा कोणता आकडा ?' वडिलांनी समजावून सांगितलें. नंतर पुढें मैलांच्या दगडावरील 18, 17, 16, 15 असे आंकडे मनांशी लक्षपूर्वक निरखून ठेवले आणि 10 चा आकडा पाहिल्याबरोबर ईश्वरचद्र वडिलांस म्हणाले, "बाबा, मी इंग्रजी आंकडे सर्वच्या सर्व शिकलों..." मुलाची ही ज्ञानलालसा व ग्रहणशक्ति पाहून ठाकुरदासांनाहि कौतुक वाटलें. पुढें ईश्वरचंद्रानें संस्कृत आणि इंग्रजी विद्येचें अध्ययन निष्ठेनें

करून आपलें ‘ विद्यासागर ’ हें नांव सार्थ केलें. वार्षिक परीक्षांतून दर वर्षी ईश्वरचंद्रास बक्षिसें मिळत होती. त्या बक्षिसांची रक्कम त्यानें बाजूस काढून ठेविली. व्याकरण विषयाचें अध्यापन केल्यामुळें त्यांना दोन महिन्यांचा पगार मिळाला होता. पहिल्या पगाराचे पैसे बक्षिसाच्या रकमेंत मिळवून ती त्यानें आपल्या आईबापाकडे पाठवून दिली ! पोटास चिमटा घेऊन त्या मातापित्यांनी ईश्वरचें शिक्षण चालविलें होतें. त्याचें सार्थक झाल्याचें पाहून त्यांना धन्यता वाटली.

आपल्याकडील कै. शि. म. परांजपे यांची अशीच गोष्ट सांगतात. सन १८९५ सालांत ते एम्. ए. ची परीक्षा पहिल्या नंबरानें पास झाले ! त्यांना ‘ झालावेदान्त ’ आणि ‘ गोकुळदास ’ अशी एकूण नऊशें रुपयांची दोन बक्षिसें मिळाली. शिवाय कांही पुस्तकेंहि पारितोषिक म्हणून मिळाली होती. शिवरामपंतांनी पुस्तकें आपणासाठी ठेवून घेतली आणि नऊशें रुपयांची रक्कम महाड येथें आपल्या आईकडे पाठवून दिली. मातोश्रीच्या डोळ्यांत आनंदाश्रू तरारले ! आणि भोळ्या भावानें पण प्रेमानें तिनें उद्गार काढले, “ आणखी थोडा अभ्यास बाळक्यानें केला असता तर पुरते हजार रुपये मिळाले असते. थोडी कसूर केलेली दिसते ! ”

ईश्वरचंद्रांचा संस्कृत अभ्यासक्रम पूर्ण झाल्यावर त्यांनी कलकत्त्याच्या फोर्ट वुल्यम कॉलेजांत नोकरी धरली. त्यांना पन्नास रुपये पगार मिळूं लागला. त्या काळी पन्नास रुपये म्हणजे मोठीच रक्कम होती. ईश्वरचंद्रांनीं आतां इंग्रजी व हिंदी भाषांचें अध्ययन चालू केलें. दोनहि शिक्षकांस मिळून ते पंचवीस रुपये देत, उरलेल्यांपैकी वीस रुपये आईकडे पाठवीत व शिल्लक राहिलेल्या पांच रुपयांत ते स्वतःचें भागवीत असत. स्वयंपाक सुद्धां ते स्वतःच्या हातांनीं करीत. ईश्वरचंद्र आईला एखाद्या देवतेप्रमाणें भजत. जगांतील एकाच देवास ते ओळखीत आणि तो देव म्हणजे आई. भगवतीदेवी म्हणजे एक रत्न होतें. फारशी शिकलीसवरलेली नसली तरी बहुश्रुत, चाणाक्ष आणि हजरजबाबी होती. ती बुद्धिमत्तेनें तीव्र असून मोठ्या गंभीर विषयांतहि ती लक्ष घालीत असे. तिच्या संबंधी अनेक कथा प्रसिद्ध आहेत.

ईश्वरचंद्राचे हॅरिसन नांवाचे एक युरोपियन मित्र होते. इन्कमटॅक्स ऑफिसर म्हणून दौऱ्यावर असताना हे एकदां विद्यासागरांच्या वीरसिंह गांवी आले. भगवतीदेवीस वाटले, मुलाच्या या साहेब मित्रास घरी जेवावयास बोलवावें. तिनें मुलाकरवी त्याना पत्र लिहिलें, " महाशय, आपला मुक्काम येथे फार थोडा दिसतो. जाण्यापूर्वी आमच्याकडे भोजनास येऊन आम्हास आनदित करावे अशी विनति आहे." हॅरिसन साहेबांनी बाईचें म्हणणें मान्य केले व ते विद्यासागराच्या घरी आले. या पडिताच्या घरी खुर्च्याटेबलांचा थाट कोठला ? हॅरिसन साहेब विजार नेसूनच खुरमांडी घालून जेवावयास बसले. चारहि मुलें पंगतीला बसली होती, आणि माता भगवतीदेवी वाढण्याचें काम करीत असतां गप्पा गोष्टी चालल्या होत्या. साहेबाचें इंग्रजी भाषण आईला बगालीत आणि आईचें बगाली बोलणें साहेबांना इंग्रजी भाषेत सांगण्याचें काम ईश्वरचद्र करीत होते. आणि मध्येंच साहेबांनी भगवतीदेवीस विचारलें:

"आपण फारच उदार दिसतां. आपल्याजवळ संपत्ति तरी किती आहे ?" भगवतीनें तात्काळ उत्तर दिलें, "चार राजण द्रव्यानें भरलेले आहेत."

हॅरिसन साहेबाच्या ध्यानांत आलें नाहीं. गोंधळून त्यानें विचारलें, "आपण कृपा करून ते मला दाखवाल का ?"

" हो, हो, न दाखवायला काय झालें ? " असें म्हणत भगवती मातेनें मोठ्या अभिमानानें आपल्या सोन्यासारख्या चार मुलांकडे बोट दाखविलें आणि ती उद्गारली, " हा माझा जामदारखाना. ही माझी जिवंत संपत्ति आहे. ही चार रत्नें आहेत " !

हॅरिसनसाहेब खूष होऊन गेला. निरोप घेतांना त्यांनी भगवतीदेवीस वंदन करून म्हटलें, " आपण फार थोर आणि भाग्यवान् आहांत. मलाहि मातेसमान वाटतां. कांही उपदेशाच्या गोष्टी सांगितल्या तर मी त्याप्रमाणें वागण्याचा प्रयत्न करीन."

आणि यावर भगवती मातेनें विनयकपूर्वक म्हटलें,

" मी बाईमाणूस. तुमच्यासारख्यांना काय सांगणार !...पण आज तुमच्या हातांत सत्ता आहे. तुम्ही मोठे अधिकारी आहांत. तुमच्यावर

फार मोठी जबाबदारी आहे. सत्तेचा दुरुपयोग कधीहि तुमच्या हातून न होवो! कोणाचेंहि नुकसान तुम्हीं करूं नये. कोणाचा तळतळाट घेऊं नका. प्रजेशी अशा प्रकारें वागा की तुमचें नांव तिच्या स्मरणात निरतर रहावें." भगवती मातेचा हा उपदेश हॅरिसनसाहेबानीं लक्षपूर्वक ऐकून त्याप्रमाणें त्यांनी आपलें वर्तनहि ठेविलें.

विद्यासागरांना सहा भाऊ होते. त्यांच्या आजोबांनीं विश्वेश्वराची आराधना केली होती. या घरातील शंकराच्या भक्तीवरून या सहा मुलांचीं नांवेंहि तशीच ठेवली गेली. दीनबंधु, शंभुचंद्र, हरचंद्र, हरिश्चंद्र, ईशानचंद्र आणि भूतनाथ असे हे सहा बंधु होते. यांपैकीं हरचंद्र, हरिश्चंद्र व भूतनाथ हे तिघे ईश्वरचंद्रांच्या डोळ्यांदेखत वारले.

ईश्वरचंद्र मोठे समाजसुधारक बनले. स्त्रीशिक्षणाठी त्याचे प्रयत्न प्रसिद्ध आहेत. या सामाजिक बाबतीत भगवती मातेचा नेहमी त्याना आशीर्वाद असे. सुधारणाच्या प्रातातहि ती पुरोगामी वृत्तीची होती. 'विधवाविवाह' हा शब्दसुद्धां ज्या काळी भयंकर होता, त्या काळी ईश्वरचद्रानी पुनर्विवाहाची चळवळ चालू केली. विधवाविवाहावरील आपला शास्त्रीय ग्रथ त्यांनीं लिहून तयार केला. त्यांना तो प्रसिद्ध करावयाचा होता. त्याच्या मनांत शंका आली; आईस आवडेल का हे करणें? विद्यासागर मातोश्रीकडे गेले आणि त्यांनीं विचारलें, "आई, मी हें पुस्तक प्रसिद्ध केलें तर तुला हें धर्मबाह्य वर्तन नाहीं ना वाटणार? तुला दुःख नाही ना होणार? तूं आज्ञा केलीस तर मी हें पुस्तक प्रसिद्ध करीन." मुलाचें प्रेम पाहून भगवतीदेवीचें हृदय भरून आलें. ती भूतदयेचा सागर होती. अनाथाचा कैवार आपला मुलगा घेत आहे हें पाहून कोणत्या मातेस आनद नाही होणार? मोठ्या कनवाळुपणानें तिनें आपल्या मुलास सांगितलें:

"तूं तुझा ग्रंथ जरूर प्रसिद्ध कर. विधवांची किती कष्टदायक दशा! एकेक दिवस युगाप्रमाणें कठतात बिचाऱ्या. सर्वांनी त्यांची विटंबना करावी, तिरस्कार करावा. मरमरेपर्यंत दुसऱ्यांसाठी त्यांनीं राबावें आणि त्याचें फळ काय; तर त्यांच्या मुखावलोकनानें सुद्धां लोकांना अपशकून! मरे-पर्यंत अश्रु ढाळावेत, दुःखाच्या दरीत आपलें जीवन संपवावें, कामाचे

डोंगरच्या डोंगर उचलावेत असें त्यांचें आयुष्य. अशा हताश, दुर्बळ बायांची आपत्ति ईश्वर, तूं दूर कर. केवढें मोठें हें सत्कृत्य आहे. परमेश्वर तुला या कामांत यश देवो."

मातेच्या या बोलण्यानें विद्यासागराना परम सतोष झाला. त्यांनी तो ग्रंथ प्रसिद्ध केला.

मातेची पूजा हा ईश्वरचंद्रांचा धर्म होता. इतर कोणत्याहि देवाकडे ते गेले नाहीत. त्या काळी प्रसिद्ध असणारे साधुपुरुष भगवान् रामकृष्ण परमहस याच्याकडे सुद्धा जावेसें त्यांना वाटलें नाहीं. शेवटी रामकृष्णच त्यांना भेटावयास आले. " आज नदी सागराकडे आली आहे " असे उद्‌गार रामकृष्णानी काढले !

विद्यासागर हे दयेचेहि सागर होते; आणि हा गुणहि त्यांनी आपल्या आईपासूनच उचललेला होता. भगवतीदेवी फार ममताळू होती. भरलेल्या दामोदर नदीत उडी टाकून मुलगा घरी आला, त्या वेळची हकीगत. जेवावयास रात्रीचे बारा वाजले. भगवतीमातेनें दमल्याभागल्या मुलास सर्व स्वयंपाक ताजा केला. तिनें विद्यासागरास भोजनास वाढलें, तों शेजारच्या घरांतील नवराबायकोचें भाषण तिच्या कानी आले, ' उद्यां मुलांना काय खावयास द्यावयाचें? आजचें पीठ सर्व सपून गेलें. तुम्हीं तर जेवणहि केलें नाहीं अजून' असें बायको बोलत होती. विद्यासागराची आई कळवळली. तिनें त्या दोघाना बोलवून पोटभर जेवावयास घातलें आणि विद्यासागरानें त्या कुटुंबास मासिक पेन्शन सुरू केलें ! भगवतीमातेचा पुत्र तो !

दरवर्षी दुर्गापूजनाचा उत्सव आला की ईश्वरचंद्र आपल्या आईकडे गोरगरिबांना देण्यासाठी कपडे पाठवी. या उत्सवाचे वेळी ही माउली मुक्त हस्तानें अन्नदान आणि वस्त्रदान करी; आणि लोककल्याण हें तर विद्यासागराच्या जीवनाचें सार होतें.

' आई ' या शब्दाची फार मोठी मोहिनी ईश्वरचंद्रावर पडे. कलकत्ता विद्यापीठाचे पहिले भारतीय व्हाइस चॅन्सलर गुरुदास बॅनर्जी. त्यांची आई निवर्तल्यावर त्यांनी एक सुंदर सोन्याचें जडावाचें पानपत्र तयार केलें. विद्यासागराखेरीज त्यांना दुसरा पवित्र ब्राह्मण कोण दिसणार ? पण

विद्यासागर तें दान घेईनात. शेवटी गुरुदासांनी डोळ्यांत आंसवें आणून म्हटलें, " माझ्या 'आई' साठी हें देत आहें." 'आई' शब्द ऐकतांच ईश्वरचंद्र विरघळले. त्यांनी तें पानपत्र स्वीकारलें ! त्यावर पुढील श्लोक कोरलेला होता.

पानपात्रमिदं दत्त विद्यासागरशर्मणे ।
स्वर्गभावतया मातुर्गुरुदासेन श्रद्धया ।।

आपल्या खेडेगांवांत विद्यासागरानी एक टुमदार बंगला झोपडीवजा बांधला होता. तेथें त्यांचे आईबाप व भावडे रहात असत. एके दिवशी ठाकुरदासाना स्वप्न पडलें की आपले सुदर घर भस्मसात होऊन गेलें ! त्या स्वप्नावर त्याचा फार विश्वास बसला. त्यानी काशीस जाऊन राहण्याचा हट्ट धरला. ठाकुरदास काशीस जाण्यास निघाले. भगवतीदेवीहि पतीच्या मागोमाग चालली. काशीस देह ठेवण्याचा ठाकुरदासांचा मानस होता. परंतु भगवतीदेवीस तेथील हवा मानवेना. घरी चलण्याचा आग्रह तिनें ठाकुरदासांना केला. पण ते घरी येण्यास कबूल नव्हते. शेवटी देवी भगवती म्हणाली, " आपण येथेंच राहिलात तर सांगून ठेवतें तुमच्या आधी मी येथें येऊन मरेन. तुमच्या अगोदर जाण्यांतच माझ्या जन्माचें सार्थक." भगवतीदेवी घरी आली. थोड्याच दिवसात ठाकुरदासांचें भविष्य खरें ठरलें. विद्यासागरांचें घर जळून गेलें. विद्यासागर कलकत्त्यास रहावयास निघाले. आईसहि येण्याचा आग्रह त्यांनी केला. परतु त्या माउलीनें उत्तर दिलें, " मी जर कलकत्त्यास आलें तर हे गरीब लोक गांवांत कोणाच्या जिवावर जगतील ? त्यांच्यासाठी मला येथें राहिलेंच पाहिजे." भगवतीदेवी जणू सर्वांची माता होती.

मध्यंतरी ठाकुरदास आजारी झाले. त्यांच्या सेवेसाठी भगवती काशीस गेली. ठाकुरदास बरें झाले आणि भगवतीनें अथरूण धरलें.

विद्यासागर कलकत्त्यास असतांना भगवती ही अशी एकाएकी आजारी झाली. तिचा आजार वाढून मरणोन्मुख अवस्थेस येऊन ती ठेपली. ती आपल्या पतिदेवास म्हणाली, " असे माझ्याजवळ बसा. मला आशीर्वाद द्या आतां." ठाकुरदास बोलूं लागले, " मी तुला काय आशीर्वाद देणार ? तूं

महापुण्यवान् साध्वी आहेस. अहेवपणीं मरण पत्करून तूं सर्व कांहीं साधलें आहेस...तुला मी काय देणार ?" आणि पूर्वी म्हटल्याप्रमाणें नवऱ्याच्या आधी भगवती देवीनें पतीच्या मांडीवर प्राण सोडला. विद्यासागर जवळ नव्हते. मातृनिधनाची हकीगत त्यांना समजली तेव्हां त्यांना ब्रह्मांड आठवलें. विद्यासागर काशींत आले आणि आईच्या स्मृतीनें त्यांना भडभडून आलें ! पुढें थोड्याच दिवसांत ठाकुरदासांचाहि अंत झाला.

त्यानतर विद्यासागराचें जीवन विरक्तपूर्ण झालें. आईच्या फोटोकडे पहात ते समाधान मानीत होते. हा फोटोसुद्धा मोठ्या कष्टानें त्यांनीं काढविला होता. हडसन नांवाचा एक फोटोग्राफर गावीं आला होता. ईश्वरचंद्रांना वाटलें आपल्या मातेचा फोटो काढून घ्यावा. परंतु भगवतीदेवी तयार होईना. तेव्हां विद्यासागर मातेस म्हणाले, "आई येवढी निष्ठुर होऊं नकोस ग ! मला दर्शन देण्याची तुझी इच्छा नाहीं वाटतें ? मी तिकडे कलकत्त्यास राहणार. तुझी मूर्ति सदैव माझ्यासमोर पाहिजे. तुझें स्फूर्तिदायी दर्शन मला सदैव पाठिराखें होईल" आई तयार झाली. फोटोग्राफरकडे भगवती कसली जाणार ! तोच तिच्याकडे आला. त्यानें एक सुंदरसा फोटो भगवतीदेवी व ठाकुरदास यांचा काढला. विद्यासागर या फोटोस जिवापलीकडे जपीत. मातेस वंदन केल्याशिवाय ते पाणीसुद्धां पीत नसत.

अशा प्रकारें भगवती मातेचा हा पुत्र होता. भगवती मातेनें आपल्या मुलास शील, विद्या, प्रेम यांची देणगी दिली आणि या सुपुत्रानें मातृभक्तीचा आदर्श निर्माण केला. 'आई' हें नांव ऐकल्याबरोबर ते कावरेबावरे होत असत. आईच्या अंतकाळीं आपण जवळ नव्हतों याची खंत त्यांना नेहमी वाटे. सदैव मातेचें स्मरण करीत, तिचा कित्ता पुढें ठेवीत त्यांनीं आपलें आयुष्य घालविलें ! एकदां मित्रांशी गप्पा मारतांना भगवतीमातेसंबंधी गोष्टी निघाल्या. विद्यासागराना रडू आवरेना. मित्रास चमत्कारिक वाटलें. तो म्हणाला, "आपल्या दुःखास मी कारणीभूत झालों. क्षमा करा." त्यावर अश्रु पुशीत विद्यासागर, म्हणाले, "यांत क्षमा कसली करावयाची ? उलट मीच तुमचे आभार मानतों. कारण या निमित्तानें तरी मातेची स्मृती तीव्र होऊन अश्रूंनी पावन झालों."

# सेंट ऑगस्टाईन

( ३५४–४३० )

हिप्पो शहराचा लोकप्रिय बिशप म्हणून याची ख्याती आहे. लॅटिन् ख्रिस्ती धर्मसंस्थेच्या चार धर्माध्यक्षापैकीं सेंट ऑगस्टाईन हा एक आहे. पूर्वायुष्यांत तत्त्वज्ञान व साहित्य यांचा अभ्यास करूनहि मनास समाधान वाटलें नाहीं म्हणून याचें लक्ष ख्रिस्ती धर्माकडे वळलें. मिलानच्या बिशपनें याला ख्रिस्ती धर्माची दीक्षा दिली. सेंट पॉलच्या पत्रांचाहि याच्या मनावर फार परिणाम होऊन त्याची वृत्ति धर्मप्रवण बनली. आफ्रिकेंत परत आल्यावर पोटापुरती इस्टेट ठेवून त्यानें बाकी सर्व विकून टाकली. आलेल्या पैशांतून त्यानें गोरगरिबाना दानधर्म केला. याचीं धार्मिक प्रवचनें फारच लोकप्रिय ठरलीं. इच्छास्वातंत्र्य, ईश्वरकृपा आणि प्रारब्धवाद या तत्त्वांबद्दल पेलाजिअसबरोबर यानें वाद केला होता. याच विषयांवर ऑगस्टाईननें अनेक प्रबंधहि लिहिले. याच्या सर्व लिखाणांत याचा 'पातकोच्चार' (Confessions) हा ग्रंथ सर्व जगाच्या मान्यतेस उतरलेला आहे.

# ७ : : ख्रिस्तप्रेमी संत मोनिका

( ३३१—३८७ )

सुमारें सोळाशें वर्षांपूर्वीची हकीगत. रोमन लोकांचें साम्राज्य फार दूरवर पसरलेलें होतें. रोमनंतर दुसरें भरभराटीत असलेलें शहर म्हणजे आफ्रिकेंतील कार्थेज हें होतें. याच गांवी एका लहानशा घरांत एक वयस्कर बाई एके दिवशी सकाळ झाली तरी झोपून राहिली होती. रोज लौकर उठून देवधर्मांत गढून जाणाऱ्या या बाईस आज जाग आली नव्हती. गेल्या रात्री कसली तरी चिंता करीत असतांनाच तिला झोप लागली. तिच्या चेहऱ्यावर एक प्रकारचें सात्त्विक तेज चमकत असलें तरी आंत कोठून तरी मन सारखें पोखरलें जात असावें असा भाव चेहऱ्यावर बारंवार स्पष्ट होत राही. ख्रिस्ती धर्मावर बाईची अलोट श्रद्धा होती. तिच्या दुःखीकष्टी जीवनांत एक परमेश्वरच तिचा वाटाड्या होता. नित्याच्या धार्मिक विधीत आणि परमेश्वरचिंतनांत ती आपले दिवस काढीत होती. ईश्वराजवळ तिच्या नित्य प्रार्थना चालू होत्या. काल रात्रीहि तिनें अशीच मनोभावें प्रार्थना केली आणि ती जी झोपी गेली ती अजून जागीच झाली नव्हती. बाहेरची हवा रात्रीपासून पार बदलून गेली होती. वारा उलटा वाहू लागल्यामुळें तिच्या झोपण्याच्या खोलीचें दार फट्दिशी वाजलें. बाई जागी झाली, तों तिचा चेहरा फारच चिंतामग्न दिसत होता. घाबरलेल्या आणि बावरलेल्याच मनःस्थितीत ती अंथरुणावरून उठली; आणि खिडकीवाटें बाहेर पाहूं लागली. "वारा बदललेला दिसतो...आणि ऑगस्टाईन ?" तिच्या चित्ताचा थरकांप उडाला होता. झटकन तिनें ऑगस्टाईनच्या खोलीकडे धांव घेतली. खोलीत जाऊन पाहते तों ऑगस्टाईनचा पत्ता नाही. तिच्या काळजाला चरका बसला. तिच्या डोळ्यांना अंधारी आली. "गेला, ऑगस्टाईन गेला मला सोडून, त्या पापी आणि भ्रष्ट देशांत गेला निघून!"

आईचें अंतःकरण द्रवून निघालें. गेले चारपांच दिवस तिला ही भीति सारखी वाटून राहिली होती. कार्थेजच्या किनाऱ्यावरून एक जहाज लौकरच रोमकडे निघणार होतें. ऑगस्टाईनचे बरेच हेलपाटे जहाजाकडे झाले.

अनेक तऱ्हेच्या चौकशाहि त्यानें केल्या. पोरगा रोमला जाण्याच्या विचारांत दिसतो हें आईनें तेव्हांच ताडलें. डोळ्यांत पाणी आणून आई म्हणाली,

" ऑगस्टाईन, किती दुःख आतां या दुर्दैवी आईला देणार आहेस ? अजून तुझे डोळे उघडले नाहीत का ? रोमला कशासाठी जाण्याच्या तयारींत आहेस ? तू रोमला जाऊ नकोस. ख्रिस्तविरोधी देश तो. तू जाऊं नकोस..." आईस रडूं कोसळत होतें. तिची अशी विकल झालेली अवस्था पाहून ऑगस्टाईन उद्गारला,

" आई, तुला एवढें वाईट वाटत असेल तर मी जात नाही; आणि मीं जी जहाजावर चौकशी केली ती माझ्यासाठी नव्हे ग. माझा एक मित्र चालला आहे रोमला. त्याच्याबरोबर मी आपला सहज म्हणून जात असतों किनाऱ्यावर."

आईचें दुःख त्याला जाणवलें होतें, परतु रोमबद्दल तिला वाटणाऱ्या भीतीबद्दल मात्र त्याला मनातून हसू येत होतें.

ऑगस्टाईननें जाणार नाही म्हणून खात्री दिली होती तरी त्याची आई लगबगीनें समुद्रकिनाऱ्यावर आली. पोरगा मित्राला निरोप देत असेल अशी तिची कल्पना. परतु येऊन पहाते तो मुलाला घेऊन जहाज दूर गेलें होतें. ऑगस्टाईन आईशी खोटें बोलून रोमला निघून गेला होता ! त्याच्या आईचें वय आतां पन्नाशीच्या बाहेर गेले होतें. पोराच्या दुर्वर्तनाने तर तिची उमेद सर्वच नाहीशी झाली असल्यानें ती अकाली थकत चालली होती. आतां तर ऑगस्टाईन पातक्याच्या देशांत निघून गेला. तिच्या अतःकरणास जबरदस्त धक्का बसला ! जड चित्तानें बिचारी घरी आली.

ऑगस्टाईनच्या बापाचें नांव पेट्रिसियस असें होतें. हा माणूस स्वभावानें बरा असला तरी ख्रिश्चन धर्माबद्दल त्याला बिलकुल सहानुभूति नव्हती. उलट त्याची बायको मोनिका हिला तर ख्रिस्ती धर्माबद्दल विलक्षण प्रेम होतें. या बाबतीत दोघांची अनेकदां खडाजंगीहि होत राही. अशा आईबापांच्या पोटी ऑगस्टाईनचा जन्म टॅगस्टी या गांवी दि. १३ नोव्हेंबर ३५४ या दिवशी झाला. पेट्रिसियस पिता या दृष्टीनें मोठा ममताळू असला तरी धर्मा-

संबंधी कांही बोलणें निघालें की तो सतापत असे. ख्रिस्तविरोधी वातावरणांतच ऑगस्टाईननें वाढलें पाहिजे असा त्यानें आग्रह धरला. नवऱ्याच्या करड्या स्वभावापुढें मोनिकाचें कांही चाललें नाही. आई या नात्यानें ती मुलाच्या मनांत ख्रिस्ताबद्दल प्रेम निर्माण करण्याचा प्रयत्न करी. परंतु भोंवतीचें सर्वच वातावरण विरोधी असल्यानें मोनिकाचें कांही चालण्यासारखें नव्हतें. छोट्या ऑगस्टाईनची बुद्धि अतिशय तीव्र होती. पहिल्याने मॅडोरा येथील शाळेंत त्याला घालण्यात आलें. तेथील अभ्यासक्रम संपल्यावर कार्थेज येथील प्रसिद्ध शिक्षणसंस्थेंत त्याचा अभ्यास सुरू झाला. ऑगस्टाईनचा बाप लहानपणीच वारला. त्यामुळें मोनिकानेच त्याचेकडे नीट प्रकारे लक्ष पुरविलें. आपली सर्व ममता तिनें त्याच्याच भोवती केंद्रित केली. ऑगस्टाईननें ख्रिस्तावर भक्ति करावी, त्याच्या धर्माचा प्रसार करावा, साधुसत म्हणून नांव कमवावें ही भावना मोनिकाची होती. परंतु लहानपणी पोरगा बापाच्या वळणांत वाढल्यामुळें प्रारभीच्या वयात त्याला ख्रिस्ताबद्दल प्रेम वाटलें नाही.

कार्थेज येथें शिक्षणासाठी आल्यावर तर ऑगस्टाईन शहरच्या भडक वातावरणांत दंग झाला. चैन आणि विलासात तो रममाण झाला. विद्यापीठांत शिक्षण घेत असतानाच त्याचें वर्तन स्वच्छदी बनलें. अत्यत बुद्धिमान विद्यार्थी म्हणून त्याचा लौकिक होता. विद्यापीठांत त्यानें नांवहि चांगलेंच कमावलें होतें. परतु त्याचे वर्तनास मात्र कोणताहि धरबंध उरला नव्हता. उत्तरायुष्यांत त्यानें जें निवेदन केलें आहे त्यात या कार्थेज येथील वागणुकीबद्दल मोठाच पश्चात्ताप त्यानें व्यक्त केला आहे.

बुद्धिमान पोराचें हें बहकणें अर्थात्‌च मोनिकाला पसंत नव्हतें. ती त्याला घरांत राहू देत होती इतकेंच. परतु त्याच्या पंगतीस जेवणेंसुद्धा तिच्या जिवावर येई. पोरगा धर्मभ्रष्ट झाला असें तिला वाटे. मनांतून मात्र ती ऑगस्टाईनवर नितान्त प्रेम करी. त्याचे वर्तन सुधारावें, त्यानें ख्रिस्ती धर्म स्वीकारावा म्हणून रोज तिच्या प्रार्थना चालू असत. मनोभावें केलेल्या या साधुबाईच्या प्रार्थना फुकट कशा जाणार ? पुढें मोनिकाच्या डोळ्यादेखतच ऑगस्टाईन मोठा संत पुरुष म्हणून प्रसिद्धीस आला. तेव्हां त्यानें आपल्या

आईबद्दल लिहितांना असें म्हटलें आहे की, " माझी आई रोज मनोभावें परमेश्वराची प्रार्थना करीत असे, आणि म्हणूनच माझ्या आयुष्याचा नाश झाला नाहीं ( It was owing to the faithful and daily prayers of my mother that I did not perish.) "

पूर्वायुष्यांत ऑगस्टाईनचा होणारा अधःपात निःसंशय त्याच्या आईच्या प्रार्थनांमुळेंच वांचला. पुत्रनिधनानें जेवढें आईला दुःख होतें, त्यापेक्षां कितीतरी अधिक वेदना मोनिकाला ऑगस्टाईनच्या या स्वच्छंदी वागण्यानें होत असत. परमेश्वराची प्रार्थना करतांना तिच्या डोळ्यांतून सतत अश्रुधारा सुरू होत असत आणि या अश्रुजलामुळें ऑगस्टाईनची सारी पापें धुऊन निघत. मोनिकाचा आधार फक्त परमेश्वर होता. त्यानें जर कृपा केली तरच ऑगस्टाईन सुधारून तिचें सुख तिला परत मिळणार होतें. मोनिकाच्या प्रार्थना जणूं परमेश्वराला ऐकूं गेल्या होत्या. एके दिवशी तिला स्वप्न पडलें. एक तेजस्वी देवदूत तिच्यापुढें उभा होता. त्याच्या मुखावर प्रसन्न हास्य चमकत होतें. मोनिका पुत्राच्या काळजीने दुःखांत निमग्न होती. परंतु देवदूत मात्र आनंदित झालेला होता. खिन्न झालेल्या मोनिकाला देवदूतानें विचारलें, "माताजी, कसलें येवढें दुःख करतेस ? ऑगस्टाईनबद्दलचें ना ? पण तूं पाहशील की लौकरच तुझा मुलगा तुझ्या पगतीला येऊन बसेल. "

मोनिकाचा येवढा विश्वास या वचनावर बसला की खरेंच ऑगस्टाईन शेजारी उभा आहे असा भास तिला झाला.

हेंच स्वप्न मनांत ठेवून मोनिका परमेश्वराच्या चिन्तनांत मग्न राहिली. वयांत आलेला मुलगा आपलें ऐकेलच अशी खात्री तिला वाटत नव्हती. कधी कधीं ती कोणा दैवी माणसासहि आपल्या ऑगस्टाईनच्या भवितव्यासबंधी विचारी. एका चांगल्या बिशपकडे ती गेली. ऑगस्टाईनचें वर्तन सुधारावें म्हणून काय काय करणें शक्य आहे याची चौकशीहि मोनिकानें केली. परतु या भाबड्या मातेस बिशपनें उत्तर दिलें, " बाई, इतकें घाबरण्याचें काय कारण ? त्याच्या वयास अनुसरून चुका होणारच. त्याचें शहाणें होण्याचें वय अजिबातच गेलें आहे असें नाही. तुम्ही मात्र परमेश्वराची प्रार्थना अखड-पणें करीत रहा. प्रत्यक्ष प्रभूच तुमच्या मुलास सन्मार्गास लावॉल. तुमच्या

नित्यनियमाप्रमाणें तुमची उपासना चालू असूं द्या. प्रभू तुमचेवर कृपा करील. तुमच्यासारख्यांचे अश्रु कां फुकट जातील ? ( Go thy ways; and God bless thee, for, it is not possible that the son of these tears should perish ) ”

मोनिका याप्रमाणें ऑगस्टाईनला सुधारण्याचा प्रयत्न करीत होती. सन ३७३ मध्यें ऑगस्टाईन आपल्या गांवी आला आणि अलंकाराशास्त्राचा अध्यापक बनला. त्यानें खिस्ती व्हावें म्हणून तिचा सारखा प्रयत्न चालूंच होता. पुनः ३७९ मध्यें तो कार्थेजला गेला. तेथेंहि चार वर्षेंपर्यंत शिक्षकाचें काम केल्यानतर रोमला जावें असें त्याच्या मनानें घेतलें. मोनिकाला हें समजलें तेव्हां तिला मनस्वी वाईट वाटलें. ऑगस्टाईन आतां तर पुरताच नास्तिक आणि उच्छृंखल होणार असें तिच्या मनानें घेतलें. नवऱ्याच्या कडक स्वभावापुढें तिचें कांहींच चाललें नाही; आणि आतां मुलगाहि हातचा चालला. उत्तम शिक्षण घेणें असेल तर विलासी वृत्ति सोडावी, साधेपणानें वागावें अशी तिची शिकवण होती. पण तिची ही शिकवण आणि तिचा सर्व त्याग वायां जाणार की काय अशी परिस्थिति निर्माण झालेली होती. आईला फसवून तो एके दिवशी जहाजांत बसून रोमकडे निघून गेला !

कित्येक वेळां होतें तें बऱ्याकरतांच होत असतें. ऑगस्टाईनचें रोमला जाणें मोनिकाला जरी आवडलें नाही तरी ऑगस्टाईनच्या जीवितांत मोठीच क्रांति होण्याची वेळ येऊन ठेपली. रोम येथें कांही दिवस काढल्यानंतर इटलीच्या उत्तरेस मिलन येथील विद्यापीठांत अलंकारशास्त्राचा प्रमुख शिक्षक म्हणून त्याची नेमणूक झाली. येथून त्याच्या जीवनाला एक नवीन दिशा मिळण्याचा योग जमून आला. मिलन येथें असतांना ॲम्ब्रोज नांवाच्या एका विद्वान बिशपशी त्याची मैत्री जमली. या विख्यात बिशपनें पूर्वायुष्यांत चांगलेंच राजकारण गाजविलें होतें. परंतु परमेश्वरभेटीच्या तळमळीनें तो आतां या पंथांत आलेला होता. या बिशपच्या सहवासांत ऑगस्टाईनला जणूं नवे डोळे प्राप्त झाले. त्याचें जीवन श्रद्धामय बनूं लागलें. ॲम्ब्रोजच्या मंगल वाणीचा आणि पवित्र राहणीचा परिणाम

ऑगस्टाईनवर फार झाला. दोघेहि विद्वान् आणि भावनाप्रधान असल्यानें एकमेकांकडे पूर्णपणें ओढले गेले. ऑगस्टाईनला आईची स्मृति आतां तीव्रतेनें होऊं लागली. आपणासाठी तिनें केवढे कष्ट घेतले, केवढा त्याग केला, आपलें वर्तन सुधारावें म्हणून एकसारखी प्रभूप्रार्थना कशी चालविली होती, आपण तिच्याशी खोटें बोलून रोमला निघून कसे आलों या सर्व गोष्टींची आठवण आता ऑगस्टाईनला होऊ लागली. मोनिकाची परम पवित्र मूर्ति त्याच्या डोळ्यांसमोर उभी राही आणि मग त्याच्या मृदु बनलेल्या चित्तांत कालवाकालव सुरू होई.

आपल्या मनांत चाललेली ही खळबळ एकदां ऑगस्टाईननें ॲम्ब्रोजला बोलून दाखविली. त्यानेंहि सहानुभूतीनें ऑगस्टाईनचें बोलणें ऐकलें आणि आईला बोलावून घेण्यास सांगितलें. ऑगस्टाईन एकदां ॲम्ब्रोजबरोबर प्रथमच चर्चमध्यें गेला. तेथील निरूपण ऐकून त्याला आपल्या आईची योग्यता अधिकच पटली. त्यानें ताबडतोब आपल्या आईस आणण्याची व्यवस्था केली.

मोनिका मिलन येथे आली. मुलगा सुधारण्याच्या मार्गावर आहे पाहून तिला खूप बरें वाटले. ऑगस्टाईननें खिस्ती होण्याचे अजून नक्की केलें नव्हतें. परतु आतां त्याच्याभोंवती मित्रमंडळ खिस्तभक्तांचें होतें. त्याच्या हृदयांत हळूहळू बदल होत होता. एके दिवशी आपल्या मुलाला घेऊन तो मोनिकापाशी आला आणि म्हणाला, "आई, मी खिस्ती होणार" !

मोनिकाचा त्याच्या बोलण्यावर विश्वासच बसेना. एवढा बदल आपल्या मुलांत केव्हां झाला ! ऑगस्टाईन खिस्तभक्त होणार ! तिला खरेंच वाटेना. शेवटी आईचे खांदे गदगदा हलवून ऑगस्टाईन म्हणाला,

"आई मी खरच खिस्ती धर्म स्वीकारणार."

आणि सन ३८७ च्या ईस्टरला ऑगस्टाईन आपल्या मुलासहित मिलनच्या चर्चमध्यें उपस्थित झाला आणि अम्ब्रोजनें दोघांनाहि बाप्तिस्मा दिला !

मोनिकाचे सर्व मनोरथ पूर्ण झाले. तिच्या प्रार्थना फळास आल्या.

तिच्या त्यागाला सुदर फळ प्राप्त झालें. ख्रिस्ती झालेल्या आपल्या मुलाला ती कडकडून भेटली. दोघांच्याहि डोळ्यांतून अश्रु लोटत होते.

मोनिकेच्या डोळ्यांदेखत फार मोठा साधुपुरुष म्हणून ऑगस्टाईनची कीर्ति सर्वत्र दरवळू लागली. त्याच्या जीवनास आतां नव्यानें प्रारभ झाला होता. ख्रिस्तभक्त झालेला ऑगस्टाईन आईबरोबर आफ्रिकेंत परत येण्यास निघाला. मध्येंच मार्गात ओस्टिआ येथें मोनिका आजारी झाली. नेत्राचें पारणें फिटल्यानंतर आतां या जगात राहण्याचें तिला कारण उरलें नव्हतें. आपलें मरण जवळ आल्याचें तिला समजले. दोनतीन दिवस ती आपल्या थोर पुत्राबरोबर अनेक प्रकारची चर्चा करीत होती. ऑगस्टाईननें या प्रसंगाचें गांभीर्य आपल्या आत्मनिवेदनांत मोठ्या आस्थेने वर्णन केलें आहे. आपल्या लेकास जवळ बोलावून मोनिका म्हणाली, "बाळा, मला येथेंच मरण येणारसें दिसतें. माझा दफनविधि आपल्याच गावी व्हावा असें नाही. येथें केलास तरी चालेल. परमेश्वराचें वास्तव्य तर सर्वत्र आहे." आईची ही विचित्र निरवानिरव ऐकतांच ऑगस्टाईनला रडूच कोसळलें!

मायलेकरें दोघेंच असल्यामुळें एकान्तांत त्याचें पुष्कळ बोलणें झालें. ऑगस्टाईननें अति सुदर वर्णन या प्रसंगाचें केलें आहे. ऑगस्टाईन लिहितो: "एकान्तांत आम्ही दोघे किती तरी वेळ बोलत होतों. संभाषणास इतका रस चढला होता की भोंवतालच्या जगाचें ज्ञानच आम्हांस उरलें नव्हतें. आमची अध्यात्मचर्चा चालली होती. साधुसंतांच्या जीवितासंबंधी आम्ही चर्चा करीत होतों." कधी ऑगस्टाईन प्रश्न करी आणि मरणाच्या पंथास लागलेली मोनिका गभीरपणें आपलें सर्व परमार्थज्ञान आपल्या मुलाला समजावून देत होती. आध्यात्मिक सपत्तीचा वारसा आपल्या मुलाच्या पदरांत आई टाकीत होती! मोनिका म्हणाली:

"आतां माझ्याविषयींच म्हणशील तर आतां मला या जीवितांत अधिक आनंददायक असें पाहण्याचें कांहीं उरलें नाहीं. आतां जगून तरी मी काय करणार आहें? आतां कोणतीहि इच्छा उरलेली नाहीं. सबंध जन्मांत एकाच गोष्टीचा ध्यास घेतलेला होता; आणि तो म्हणजे मृत्यूपूर्वी तुला ख्रिस्ती झालेलें पाहावें हा होता. शेवटीं परमेश्वरानें माझ्या प्रार्थना ऐकल्या

आणि त्यानें माझी ही एकच शेवटची इच्छा पूर्ण केली. आतां मरणाची मी वाटच बघत आहें. प्रभूचा हुकूम होण्याचा अवकाश......नाहीं ऑगस्टाई ऽ ऽ न ऽ ऽ !''

मोनिकेचा स्वर क्षीण होत होता. ऑगस्टाईनचें अंतःकरण भरून आलें. दुःखाचा आवेग त्याला आवरेना. ऑगस्टाईननें आपल्या निवेदनांत लिहिलें आहेः

'' आईच्या प्रश्नाला मी काय उत्तर दिलें तें मला स्मरत नाहीं. ताप आल्याच्या नवव्या दिवशी, आणि वयाच्या छपन्नाव्या वर्षी आईचा भक्तिमय आणि पवित्र आत्मा तिच्या कुडींतून निघून गेला. हलक्या हातानें मी तिच्या डोळ्यांच्या पापण्या मिटल्या आणि माझें हृदय दुःखानें भरून आलें.''

---

## जॉर्ज वॉशिंग्टन

( १७३२–१७९९ )

अमेरिकन संयुक्त संस्थानांचा पहिला अध्यक्ष म्हणून जॉर्ज वॉशिंग्टनची प्रसिद्धी आहे. सन १७७५ सालीं इंग्लंडशीं झालेल्या स्वातंत्र्ययुद्धांत अमेरिकन सैन्याचा हा मुख्य सेनापती होता आणि विजयानंतर तो आपल्या गांवीं जाऊन राहिला. सन १७८७ मध्यें संस्थानांच्या संघाचे नियम दुरुस्त करण्यासाठीं जी बैठक भरली होती तिचा अध्यक्ष म्हणून यानें काम केलें. १७८९ मध्यें अमेरिकन लोकराज्याचा पहिला अध्यक्ष म्हणून याची निवड झाली. पुनः १७९३ मध्येंहि हाच निवडून आला. आपल्या प्रभावी कर्तृत्वाच्या जोरावर यानें अमेरिकन लोकराज्याचा उत्कर्ष केला. संयुक्त संस्थानांच्या स्वातंत्र्यप्राप्तीचें सर्व श्रेय जॉर्ज वॉशिंग्टन याच्या सैनिकी नेतृत्वाला आणि निःस्वार्थी देशसेवेला देण्यात येतें. " First in war, First in peace, and First in the hearts of his country-men" असा गौरवपूर्ण उल्लेख अमेरिकन लोक जॉर्ज वॉशिंग्टनबद्दल करीत असतात.

## ८ : : मेरी बाल वॉशिंग्टन

( १७०६–१७८९ )

समोर बर्फमय नदी वहात होती, आणि नदीच्या पलीकडे कसें जावें याची चिंता कांठावरील शिपाईगड्याला लागली होती. जवळ असलेला महत्त्वाचा खलिता ठरल्या मुदतींत गव्हर्नरला देणे अत्यंत आवश्यक होतें. परंतु समोरची नदी कशी ओलाडावी? शिपायास फारसें विचारात पडावें लागलें नाही. आपल्या सोबत्याच्या साह्यानें त्यानें एक ताफा तयार केला; आणि त्यावर बसूनच त्याने नदीपार होण्यास आरभ केला. नदीच्या मध्यावर आल्यावर बर्फाच्या एका प्रचड लोढ्याने ताफ्यास जोराचा धक्का दिला. शिपाईगडी नदीत पडला. त्याचे कपडे भिजून गेले, अगावर बर्फाचे तुकडे चिकटले होते. शिपाईगडी पट्टीचा पोहणारा असल्याने मोठ्या कौशल्यानें पोहत पोहत त्यानें ताफा गाठला. सकटातून जीव बचावलासें पाहून सोबती त्या शिपायास बोललाः

"साहेब! खरोखर, ईश्वराची कृपा म्हणून आपण आज वाचलात!" यावर शिपाई गड्यानें उत्तर दिलेः

"जोंपर्यंत एक प्रेमळ जीव माझ्यासाठी परमेश्वराजवळ नित्य प्रार्थना करीत आहे तोपर्यंत मला भिण्याचे काय कारण?"

शिपायानें ज्या "प्रेमळ जीवा" चा उल्लेख अभिमानानें आणि विश्वासानें केला तो जीव म्हणजे त्याची स्वतःची आई मेरी वॉशिग्टन् आणि स्वतः शिपाई म्हणजे जॉर्ज वॉशिग्टन.

आपल्या चारित्र्यानें आणि लष्करी नेतृत्वानें अमेरिकेला स्वातत्र्य प्राप्त करून देणारा आणि सन १७८९ मधील अमेरिकेचा पहिला लोकनियुक्त अध्यक्ष म्हणून जॉर्ज वॉशिग्टनचे नाव जगांत प्रसिद्ध आहे. Father of his Nation (राष्ट्राचा जनक) असा अजूनहि त्याचा उल्लेख केला जातो. जाज्वल्य देशाभिमान, ईश्वरावर अलोट श्रद्धा, दया-क्षमा आदि गुणांचा विकास, कर्तव्यनिष्ठा, आत्मविश्वास, आदर्श असें चारित्र्य इत्यादि

अनेक गुणांनीं जॉर्ज वॉशिंग्टन् हा संपन्न असा होता; आणि या सर्व गुणांचें बीजारोपण त्याच्यांत त्याच्या आईनें केलें होतें.

मेरी बाल वॉशिंग्टन ही व्हर्जिनियामधील एका श्रीमंत वसाहतवाल्याच्या पोटीं सन १७०६ मध्यें जन्मास आली. ती अत्यंत स्वरूपवान् असून स्वभावानें करारी पण प्रेमळ आणि धार्मिक होती. आल्यागेल्यांचें आदरातिथ्य ती हसतमुखानें करी. तिच्या वयाच्या तेराव्या वर्षींच तिची आई वारल्यामुळे ती आपल्या बहिणीकडे रहात असे. सन १७३० च्या सहा मार्च रोजी तिचें लग्न ऑगस्टाईन वॉशिंग्टनशी झालें, आणि या दांपत्यास सन १७३२च्या २२ फेब्रुवारीस पहिला मुलगा झाला. तोच पुढें प्रसिद्धीस आलेला जॉर्ज वॉशिंग्टन्.

जॉर्जचें चारित्र्य चांगलें घडलें जावें म्हणून ऑगस्टाईननें फारच श्रम घेतले होते. बापाच्या आवडत्या झाडावर जॉर्जनें केलेला कुऱ्हाडीचा वार आणि यासंबधींचें त्याचें सत्यकथन, बागेंतल्या ताटव्यांत " जॉर्ज वॉशिंग्टन " अशी अक्षरें कोरून परमेश्वराच्या कर्तृत्वाची साक्ष मुलाला पटविणें, या आणि अशा अनेक कथा प्रसिद्ध आहेत. परंतु जॉर्जचा बाप लहानपणींच वारल्यामुळें त्याच्या मनावर उत्तमोत्तम संस्कार करण्याची जबाबदारी मेरी वॉशिंग्टनवर म्हणजे जॉर्जच्या आईवर येऊन पडली आणि ती तिनें मोठ्या शिस्तीनें पार पाडली. आज्ञाधारकता आणि सत्यनिष्ठा यांवरच मुलांमुलींचें चारित्र्य अवलंबून असतें अशी तिची श्रद्धा होती. ती आपल्या नवऱ्याजवळ बोले, " मला असें वाटतें की आज्ञाधारकपणा आणि सत्यप्रीति यांतूनच आदर्श नागरिक परमेश्वर निर्माण करतो. चांगल्या कुटुंबव्यवस्थेंतूनच देशाचें चांगलें सरकार निर्माण होणें शक्य आहे; आणि म्हणून सत्ता गाजवण्यापूर्वी आज्ञापालनाची शिस्त आपणास लागली पाहिजे; पवित्र बायबलांत हेंच शिकविलें आहे. आईबापांची आज्ञा पाळणें हाच मुलांचा धर्म आहे. आईबापाची इच्छा पाळणें म्हणजे परमेश्वराची आज्ञा मानणें आहे. "

आणि हाच आज्ञाधारकत्वाचा गुण आपल्या जॉर्जमध्यें तिनें पूर्ण ठसविला होता. आज्ञा करण्यापूर्वींच मुलानें आपली इच्छा समजून घ्यावी आणि तसें वर्तन करावें, अशी तिची शिकवणूक होती. थोरल्या सावत्र

भावाच्या सहवासानें वयाच्या पंधराव्या वर्षी जॉर्जच्या मनांत आलें कीं आपण आरमारात नाव द्यावें, उत्तम खलाशी व्हावें हें त्याचें स्वप्न होतें; आणि आतां तें साकार होणार होतें. आईपुढें जॉर्ज खलाशाच्या वेषांत उभा राहिला. उणीपुरी उंची आणि चेहऱ्यावरचा उमदा भाव पाहून मातेला धन्य वाटलें; परतु त्याच्या मनातील हेतु समजून आल्यावर तिला दुःख झाले. एवढ्या कोवळ्या वयात पोराने हे साहस करू नये असें मनांत येऊन नेहमी कणखरपणानें वागणारी जॉर्जची आई बावरून गेली. तिला हुंदके येऊ लागले; आणि रडत रडतच ती म्हणाली;

" जॉर्ज, मी तुला जाऊ देणार नाही. तूं गेलास तर माझें हृदय फुटून जाईल. "

" आई, पण आतां न जाऊन कसें चालेल ? माझें सामानसुद्धां मीं पाठवून दिलें. लॉरेन्सनें सर्व व्यवस्था..."

" जॉर्ज...सामान परत बोलीव. हा पोषाखहि परत करून टाक. तू मोठा झालास, परतु माझेकडे पहा ना ? "

आईच्या दुःखानें जॉर्ज विरघळून गेला. त्याच्याहि गालांवरून घळघळा अश्रू ओघळू लागले; आणि त्यानें उत्तर दिलें,

" आई, तुला वेदना होत असतील तर मी जात नाहीं. "

आईच्या करुण मूर्तीपुढें जॉर्जनें आपली बळवत्तर झालेली इच्छा सोडून दिली. आज्ञापालनाचें महत्त्व जॉर्जला त्याच्या आईनें पुरेपूर शिकविलें होतें आणि त्याचाच उपयोग त्याला पुढील कर्तबगारीत फार झाला. सत्यनिष्ठा हें दुसरें महत्त्वाचें सूत्र जॉर्जच्या जीवितांतील होतें. सत्य स्वभावतःच कडवट असलें तरी परिणामी अत्यंत हितकर असतें ही शिकवण त्याच्या आईनेंच दिली होती.

नवऱ्याच्या मृत्यूनंतर मेरी वॉशिंग्टनच इस्टेटीची व्यवस्था चोखपणें पहात होती. चांगली चांगली घोडी पाळण्याचा तिला छंद होता. तिच्या जवळ नुकतेंच वयांत आलेलें एक उमदें शिंगरू होतें. तें कोणालाहि आपल्यावर स्वार होऊं देत नसे. एके दिवशीं जॉर्ज आपल्या कांहीं मित्रांसह

या शिंगराजवळ आला. अवखळ असणाऱ्या घोड्यावर स्वार होण्याची त्याची इच्छा प्रबळ झाली. सगळ्या मित्रांनी त्या शिंगराला एका कोपऱ्यांत घेरलें, आणि त्यावर जॉर्जनें बैठक मारली. शिंगरू आधीच चिडून गेलें होतें. जॉर्जला पाठीवरून फेकण्याचा त्यानें खूप प्रयत्न केला. लगाम खेंचून जॉर्ज खंबीरपणें बसला होता. जनावर पिसाळून गेलें, लाथा झाडूं लागलें, खिंकाळू लागलें आणि या झटापटींत अडखळून पडलें. सर्वांच्या ध्यानात आलें की प्रसंग भलताच उद्‌भवला होता. शिंगरू मरणाच्या पथास लागले होतें. त्याचा एक पाय मोडला होता, तोंडातून रक्त वहात होतें. जॉर्ज कळवळला---
" अरेरे ! मी असा अतिरेक करावयास नको होता. आईला वाईट वाटेल या सर्व प्रकारामुळे; पण हा सर्व वृत्तात तिला सांगितलाच पाहिजे."

मुलें घरी आली. जॉर्जच्या आईनें पहिलाच प्रश्न केला;

" अरे, आपलें तें अरेबियन घोडें पाहिले कोणी ? "

कोण उत्तर देणार ? सर्वजण मनात घाबरून चुप होती. शेवटी धिटाईनें जॉर्ज बोलला;

" आई, घोडें मरून गेले ! मला क्षमा कर आई ! "

आईला धक्का बसला. सर्व सत्य हकीगत जॉर्जकडून समजल्यावर आई बोलली,

" जॉर्ज, तुझें हें सत्यकथन हजार जनावरांपेक्षां मला मोलाचें आहे. आनंदानें मी तुला क्षमा करीत आहें; आणि ध्यानात धर की या दुर्दैवी घटनेनें तुला जो धडा शिकविला आहे तो तुला पुढें जन्मभर मार्गदर्शक होईल."

लहानपणी जॉर्जचे हे असे उद्योग होते आणि त्यांतूनच त्याची आई त्याला शिक्षण देत होती.

मेरी वॉशिंग्टन मोठी धार्मिक होती. बायबलच्या खालोखाल मॅथ्यू हेलच्या Contemplations, moral and divine ( पारमार्थिक आणि नैतिक विचार ) या ग्रंथावर तिची भक्ति होती. यांतलि वचनांनुसार ती स्वतः वागत असे व आपल्या मुलालाहि त्याप्रमाणेंच पाठ देत असे. दीर्घोद्योग, स्वार्थत्याग, निश्चय, धैर्य, सत्यवक्तेपणा, शिस्त इत्यादि

आवश्यक अशा मानवी सद्गुणांचा विचार या ग्रथात फार चांगल्या रीतीनें केलेला असल्यानें जॉर्जचे शिक्षण या ग्रथांतील तत्त्वांबर आधारलेलें असे. मेरी वॉशिंग्टनचे आचरणहि अत्यत पवित्र होते. एकातवासात ध्यान-धारणा व परमेश्वराची प्रार्थना करुन तिनें आपल्या चित्ताची प्रसन्नता वाढविली होती. परमेश्वरावरील अढळ विश्वासामुळे तिला सकटप्रसगी असा-मान्य धैर्य येत असे. संसाराच्या ऐन भरात असताना नवरा ऑगस्टाईन मरण पावल्यानें मेरीच्या अतःकरणास जबरदस्त धक्का बसला; तरी ख्रिश्चन धर्मावरील तिच्या श्रद्धेमुळे तिला तो तापदायक वाटला नाही. मुलें लहान असल्यानें आतां ही बाई इस्टेटीची व्यवस्था कशी लावणार ? मुलांच्या शिक्षणाचें काय करणार ? अशी चिता भोंवतीच्या लोकांना होती. मदती-बद्दल विचारणाऱ्या त्या लोकाना तिने सागितले,

" नको. नको. धन्याच्या मृत्यूमुळे परमेश्वरानें जी जबाबदारी माझेवर टाकली आहे ती माझी मलाच पार पाडावयास पाहिजे. आवश्यकतेप्रमाणें तोच मला या वेळी शहाणपणा आणि शक्ति देऊन सहाय्य करील. आपले आपण स्वतः दुर्बळ असू , पण ईश्वराच्या साह्याने आपण बिकट कर्तव्यहि पार पाडू शकतों. "

तिची परमेश्वरावरील ही निष्ठा जॉर्जला हरघडी उपयोगी पडली. उत्तर अमेरिकेंत सत्तासपादनासाठी फ्रेंच आणि इंग्लिश याचे नेहमी झगडे होत असत. इ. स. १७५२ च्या सुमारास असेंच एक भांडण निर्माण झालें. त्याच्यासबंधी चौकशी करण्यासाठी फ्रेंचांच्या मुलखांत जाणारा एखादा वकील नेमावयाचा होता. काम मोठें बिकट होतें. भयंकर आणि हिंस्र अशा श्वापदांनी भरलेल्या डोंगराळ आणि रानटी प्रदेशांतून जवळजवळ सहाशें मैलांचा प्रवास करणें जरूर होतें. शिवाय वाटेंत मूळचे रहिवासी इडियन लोक यांचेकडून लूटमार होण्याचा सभवहि फार होता. अशा संकटांत जाणून बुजून कोण उडी टाकणार ? पण जॉर्ज, कोवळा एकोणीस बीस वर्षांचा जॉर्ज-आपण होऊन गव्हर्नरकडे आला आणि ही महत्त्वाची कामगिरी त्यानें अंगावर घेतली; आणि प्रत्यक्ष मोहिमेवर निघण्यापूर्वी एक धावती भेट त्यानें आपल्या आईला दिली. मुलानें स्वीकारलेलें साहस पाहून

ती पहिल्यानें गडबडून गेली. पण धीर धरून व प्रसगाचें महत्त्व ओळखून तिनें जॉर्जला प्रेमळ शब्दांत निरोप देऊन म्हटलें;

"माझ्या लाडक्या जॉर्ज, या लहानग्या वयांत फारच साहसाचें काम पत्करलेंस हें तूं...परमेश्वर तुला शहाणपण देईल आणि वाटेंतील सकटांतून तोच तुझी मुक्तता करील. तू यशस्वी होऊन परत येईपर्यंत मी तुझ्यासाठीं परमेश्वराजवळ प्रार्थना करीत राहीन.... " आणि आईच्या याच प्रार्थना त्याला पुढें सतत उपयोगी पडल्या. याच कामगिरीवरून परत येतांना बर्फाच्या नदींतून पार होतांना झालेल्या अपघातांतून तो वांचला, या गोष्टीचें श्रेय त्यानें आईच्या प्रार्थनेसच दिले.

अमेरिकेनें सन १७७६ साली पुकारलेल्या स्वातत्र्ययुद्धांतील जॉर्जची कामगिरी अविस्मरणीय आहे. सहा सात वर्षे चाललेल्या या अत्यत तीव्र अशा झगड्यांत त्याला आईच्या प्रार्थनेचें मोठें पाठबळ वाटे. शेवटीं १७८१ च्या जुलै महिन्यात यॉर्कटाऊन येथें ब्रिटिश सेनापती कॉर्नवालिस अमेरिकनांना शरण आला. वॉशिंग्टनची कीर्ति सर्वत्र दुमदुमून राहिली. जॉर्जच्या कर्तबगारीमुळें अमेरिका स्वतत्र होऊं पाहात होती. या त्याच्या विजयामुळें अमेरिकेंत नवें चैतन्य निर्माण झालें. कॉर्नवालिसच्या पराभवाची बातमी जॉर्जनें प्रथम आपल्या आईस कळविली. मेरी वॉशिंग्टन यावेळी फ्रेड्रिक्सबर्ग येथें होती. इंग्लंडवर विजय मिळविणाऱ्या वीराची आई म्हणून जो तो तिचा गौरव करूं लागला. ही शुभदायक वार्ता कानावर येतांच तिच्या तोंडून उद्गार निघाले, "परमेश्वरा तुझी दया अगाध आहे...आतां युद्ध संपेल. सबध देशांत शांतता, स्वातत्र्य आणि सुख नांदेल... "

"मेरी, तुझा मुलगा जगांतील सर्वश्रेष्ठ सेनानायक आहे" एक उद्गारला.

"सर्व सैन्य त्याचेंच पूजन नि गुणगान करीत आहे." दुसरा म्हणाला. या गौरवपूर्ण उद्गारांतून मेरीला एक उणीव दिसली. दैवी पाठबळाकडे सर्वांचें दुर्लक्ष झालेलें पाहून ती उद्गारली:

"ज्या ईश्वरानें हा सोन्याचा दिवस दाखविला त्याला आपण कसें विसरावें ! " आणि खरोखरीच युद्ध चालूं असतांना सहा वर्षेपर्यंत मेरीनें

देवाजवळ एकनिष्ठपणें प्रार्थना चालविली होती. आपल्या राहत्या घराशेजारींच तिनें एक निवान्त अशी जागा केली होती आणि तेथें ती जॉर्जसाठी परमेश्वराला आळवीत होती. जॉर्जच्या या अपूर्व विजयाचें सर्व श्रेय तिनें परमेश्वरालाच दिलें.

कॉर्नवालिसच्या पराभवानंतर युद्ध संपतांच जॉर्ज तांतडीनें आईला भेटण्यासाठी फ्रेड्रिक्सबर्गला आला. सहा वर्षांनी तो परत आपल्या आईला भेटत होता. अतृप्त डोळ्यांनी जॉर्जची आई दारांतूनच आपल्या विजयी मुलाकडे पहात होती. मातेचें वात्सल्यपूर्ण हृदय भरून आलें. सर्वत्र स्तब्धता होती. दोघाच्याहि डोळ्यातून पाणी ओघळत होतें. जॉर्जला कवटाळून मेरीनें " जॉर्ज जॉर्ज " येवढेच शब्द उच्चारून त्याचें चुंबन घेतलें आणि आवेग शात झाल्यावर ती बोलली;

" परमेश्वरानें माझी प्रार्थना ऐकली. जॉर्ज, परमेश्वरानें माझी विनवणी मान्य केली आणि म्हणूनच आज तू मला या गौरवपूर्ण अवस्थेंत भेटलास. "

" होय आई, परमेश्वराने तुझी प्रार्थना ऐकली आणि त्याची दया भाकण्यासाठी तू जें व्रत आरभिलें होतेंस त्याचेंच बळ मला रणांगणावर स्फूर्ति देत होतें. "

मेरीनें जॉर्जला काळजीपूर्वक न्याहाळलें व ती बोलली;

" जॉर्ज, किती रे तुझ्यांत बदल झालाय ! युद्धाची दगदग तुला मानवलेली दिसत नाही ! "

" खर आहे आई, युद्धकाळांत माणूस लौकर म्हतारा होतो; पण आई, तशी माझी प्रकृति चांगली आहे आणि आतां तुझ्याजवळ मी विश्रांति घेईन तेव्हां तर पुनः पहिल्यासारखा ताजातवाना होईन. "

एक तासभर मायलेकरांचें सभाषण चाललें होतें. मेरी या वेळीं सत्तरीचें घर ओलांडून गेलेली होती. कर्तृत्ववान पुत्रानें तिचें वार्धक्य सफल केलें होतें.

फ्रेड्रिक्सबर्गच्या नागरिकांनी जॉर्जच्या सन्मानासाठी एक समारभ भरविला. मेरी वॉशिंग्टनला अर्थातच आमंत्रण होतें. तें स्वीकारतांना तिनें

अर्थपूर्ण उद्‌गार काढले, " समारभांत उत्साहानें नाचण्याचे आतां माझे दिवस नाहीत. पण मी येईन,... माझ्याकडून शक्य तो सहभागी होण्याचा प्रयत्न करीन." व्हर्जेनियांत एवढा आनदमय समारभ कधीच भरलेला नव्हता. नागरिकांचा उत्साह उतास आला होता. समारभाचें स्थान निरनिराळ्या भरजरी आणि रेशमी वस्त्रांनी सुशोभित केले होतें. सगीत वाद्यांचे सूर उदात्ततेंत भर घालीत होते. वॉशिग्टनचे लष्करी सहकारीहि उपस्थित होते. नटून थटून आलेले स्त्रीपुरुष एकच गर्दी करीत होते. या सर्व भपक्यांत आणि गडबडीत गुंग झालेला समाज एकदम स्तब्ध झाला. अचानकपणें मेरी वॉशिंग्टन हिनें आपल्या मुलाच्या खांद्यावर हात ठेवून प्रवेश केला होता. विजयी सेनापतीची आई! सर्वांनी तिला वदन केले. युरोपियन व अमेरिकन अधिकाऱ्यांची ओळख वॉशिग्टननें करून दिली. मेरीच्या साध्या वर्तनाचें सर्वांना नवल वाटलें.

नऊचा ठोका पडल्याबरोबर जॉर्जची आई ताडकन् उठली आणि आपल्या मुलाला म्हणाली;

" जॉर्ज, चल घरी...म्हाताऱ्या माणसांनीं घरी जाण्याची बेळ झाली ही. " या सत्कारसमारभाबद्दल तिनें सर्वांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानले आणि आपल्या मुलाच्या खांद्यावर भार टाकून हळूहळू पावलें टाकीत ती घरीं निघाली.

मेरीच्या वर्तनांतील कमालीचा साधेपणा व निरभिमानी वृत्ति यांची छाप सभाजनांवर मोठीच पडली.

जॉर्जच्या कर्तृत्वाबद्दल योग्य तो अभिमान मेरीला असला तरी ती गर्विष्ठ मुळीच नव्हती. मुलाबद्दलचा आत्मविश्वासहि तिचा दृढ होता. स्वातंत्र्ययुद्ध सपल्यानतर जॉर्जचा एक फ्रेंच मित्र लॉ फॉ मेरीला भेटण्यास आला व म्हणाला;

" जार्जच्या आई, अशा पराक्रमी मुलाला जन्म देऊन तुम्ही धन्य झालांत!"

" मी आपली आभारी आहें " मेरीनें उत्तर दिलें.

" तुमच्या मुलानें मिळविलेल्या हा विजय मोठाच अपूर्व आहे आणि

तो पाहण्यास आपणहि आहांत हीहि समाधानाची गोष्ट..." आणि लॉ फॉं नें जॉर्जच्या पराक्रमाच्या गोष्टी सांगण्यास आरंभ केला. तो त्याच्या स्तुतिगानांत असतांनाच मेरी वॉशिंग्टन उद्गारली;

" जॉर्जनें हें यश संपादलें यांत कांहीच नवल नाहीं. पहिल्यापासूनच तो तसा मोठा गुणी पोरगा आहे. "

लॉ फॉं आपल्या मनांत काय समजावयाचें तें समजला.

युद्धसमाप्तीनंतर जॉर्ज मौंट व्हर्नान येथें राहू लागला. आपल्या आईनेंहि आपल्याजवळ राहावें अशी त्याची जबर इच्छा होती. त्यानें आईला म्हटलें;

" आई, तुझें आतां वय झालें. तू चल माझेजवळ राहावयास. तुझ्या संगतींत मला आनंद वाटेल." यावर आईनें उत्तर दिलें;

" अरे जॉर्ज, हें पिकलें पान कधीं तरी आतां गळणारच. तुझ्या तत्प-रतेबद्दल आणि माझ्यावरील प्रेमाबद्दल मला मोठा संतोष वाटतो...पण मला वाटतें माझी निगा राखण्यास माझी मी पूर्ण समर्थ आहें. "

आणि मेरी वॉशिंग्टन फ्रेड्रिक्सबर्गलाच राहिली.

सन १७८९ मध्यें सेनापती वॉशिंग्टन अमेरिकेचा पहिला लोकनियुक्त अध्यक्ष झाला. आता त्याला न्यूयॉर्कला राहणें जरूर होतें. तत्पूर्वी तो आपल्या वृद्ध आईस भेटला आणि म्हणाला;

" आई, ईश्वरी योजनेनुसार हीहि जबाबदारी माझेकडे आली आहे. मी तुझा आशीर्वाद मागण्यासाठीं आलों आहें."

" जॉर्ज, तूं आपलें कर्तव्य करीत आहेस. त्यांत तुला अपयश कधीं येणार नाही. माझे आतां दिवस संपत आले आहेत. तुझी-माझी भेट आतां होईल की नाही..."

" आई...असं बोलू नकोस. खात्रीनें मी पुनः भेटेन. "

दोघांच्याहि स्वरांत कमालीचें कारुण्य होतें. होणारी गोष्ट जणू दोघां-च्याहि ध्यानीं आलेली होती.

मेरी वॉशिंग्टनला ञ्यॅंशींवें वर्ष चालूं होतें. छातींतील कॅन्सरच्या दुखण्यानें ती खंगत चालली होती.

" जॉर्ज, मी आतां थकत चाललें. दुखणेंहि सहन होत नाहीं. निर्भय चित्तानें आतां परमेश्वराच्या हुकुमाची वाट पाहात आहें." भावनेचा आवेग थांबवून ती उद्‌गारली; "जा. जॉर्ज, कर्तव्य सोडूं नकोस. परमेश्वर तुला मार्गदर्शन सतत करीत राहील."



वॉशिंग्टनच्या मनावर फारच परिणाम झाला. आईच्या खांद्यावर आपलें मस्तक त्यानें ठेवलें; आणि मेरी आपल्या जीर्ण आणि थरथरत्या हातांनीं त्याला कुरवाळूं लागली. जॉर्ज ढसढसून रडूं लागला. आजपावे-

तोंच्या सहस्रावधी स्मृती त्याच्या मनांत उफाळून आल्या. लहानपण आठवून तो बेचैन झाला. आईनें आपल्याला शिकविलें, लहानाचे मोठे केलें, उत्तमोत्तम संस्कार आपणावर केले, दृढनिश्चयी आणि कर्तव्यतत्पर बनविले, शिस्तीचे पाठ दिले, आणि या तिच्या मार्गदर्शनामुळें आपण आज येवढ्या थोर पदास पोंहचलों . .आज त्या आईला आपण सोडून जाणार ! कोणास माहीत ती पुनः दिसेल कीं नाही तें ! वॉशिंग्टनचें चित्त कळवळून निघालें.—पण त्याला न्यूयॉर्कला जाणें भाग होतें !

जॉर्जच्या दृष्टीस त्याची आई पुनः पडली नाही. सन १७८९ च्या ऑगस्टच्या पचविसाव्या तारखेस तिला मरण आलें. मरणसमयी तिची वृत्ति आनदी होती. खिस्तावर पूर्ण श्रद्धा असल्याने हा 'मुक्तीचा सोहळा' तिला आनददायक वाटला.

मेरी वॉशिंग्टनचें चरित्र येथें सपले.

जॉर्ज वॉशिंग्टनचे जेव्हां जेव्हां नांव उच्चारले जाते तेव्हा तेव्हां त्याच्या आईचीहि स्मृति होते. इतिहासकार आणि कवि, मुत्सद्दी आणि वक्ते यांनीं जॉर्ज वॉशिंग्टनच्या चारित्र्यघडणांत आणि त्याच्या कर्तबगारीत मेरीचा असलेला वांटा एकमुखानें मान्य केला आहे. मेरी वॉशिंग्टन मोठी निश्चयी आणि कोणत्याहि प्रसगी न डगमगणारी अशी स्त्री होती. फक्त एकाच गोष्टीची तिला भीति वाटे. बाहेर अधारून येऊन ढगाचा गडगडाट झाला, विजा चमकूं लागल्या, की मेरीच्या मनांत भीति निर्माण होई. इतर सर्वत्र निर्भय वृत्तीने वावरणारी मेरी या नैसर्गिक गडगडाटास कां भीत असे ? त्यालाहि एक कारण सागण्यात येतें.

मेरी पधरा वर्षांची असतांना ती एकदां आपल्या एका मैत्रिणीबरोबर शेतांतून चालली होती. इतक्यात भयानक तुफान सुटलें; मेघांच्या गर्जनेनें आणि विजेच्या लखलखाटानें सर्व वातावरण दुमदुमून गेलें. इतक्यांत एक विजेचा लोळ त्या मैत्रिणीला चाटून गेला; आणि ताबडतोब ती मरण पावली. या भीषण प्रसगाचा तीव्र ठसा लहानग्या मेरीच्या मनावर उमटला; आणि पुढें केव्हांहि वादळाचा प्रसग आला की तिच्या मनावरील तो पूर्वीचा संस्कार जागा होत असे. येवढा

प्रसंग सोडून दिला तर सबंध व्हर्जेनियात तिच्याएवढी धीराची व निश्चयाची बाई नव्हती. जादूटोणा आणि करणीसरणीवर तिचा विश्वास नव्हता, तरी पण जॉर्ज पांच वर्षांचा असताना तिला जे एक स्वप्न पडलें होतें, त्याचा विचार ती जन्मभर करीत असे. तिच्या लाडक्या जॉर्जचे बरेच सूत्रमय संबंध त्यांत प्रगट झालेले असावेत. आपल्या स्वप्नाचा वृत्तान्त ती शेजाऱ्यांना अनेकदां सांगत असे.

"—एका मोठ्या नव्या घराच्या ओट्यावर मी बसलें होतें. जॉर्ज त्या वेळी पांच वर्षांचा होता. शेजारच्या बागेत एका निग्रो सोबत्याबरोबर तो आपलें छोटेसें शेत नांगरण्यात गुग होता. ओट्यावर मी माझ्या कामांत गुंतलेलें असतांना एकाएकी घराच्या पूर्वेकडून मोठा आरडाओरडा ऐकूं आला. मी धांवून पाहिलें तों घराच्या छपरांतून भीषण असे आगीचे लोळ बाहेर येत होते. मी स्तब्ध होऊन गेलें. माझी सर्व शक्ति संपुष्टात आली. मटकन् खालीच बसलें. माझा धनी व माझी नोकरमाणसें धांवत आली, परंतु तेहि आग विझवूं शकले नाहीत. या भयानक अवस्थेत माझ्या लाडक्या जॉर्जची मूर्ति मला दिसूं लागली, मी 'जॉर्ज जॉर्ज' अशा हांका मारल्या आणि क्षणांतच त्यानें उत्तर दिलें "आई, कां ग हांका मारतेस? मी चांगला मुलगा आहें. नेहमी नाही का तुझ्या हाकेसरशी धावून येत?" घर पेटत आहेसें पाहून तें पांच वर्षांचें पोर आग विझवण्यास प्रवृत्त झालें. आणि म्हणतें कसें की "ममा, भिऊं नको. सर्व शक्तिमान परमेश्वर आपणाला मदत करील."

या त्याच्या वचनानीं आम्हा सर्वांना धीर आला व आम्हींहि त्याच्या मदतीस गेलों. एक शिडी आणून त्यावर जॉर्ज खारीच्या चपळाईनें चढला. त्याच्या मित्रांनीं पाणी पुरविलें; तें पोर सर्वांना धीराचे शब्द बोलून उत्तेजन देत होतें. काय होणार याचा नेम नव्हता. इतक्यांत कोण्या एका वयस्कर माणसानें जॉर्जला साह्य दिलें, आणि नंतर सर्व शांत झालें. आगीत झालेलें नुकसान पाहून आम्ही दुःखित होतों... तेव्हां जॉर्ज आम्हास म्हणतो, "आई, तुम्ही सर्वजण जर हो म्हणत असाल तर याहि पेक्षां सुदर घर आपण निर्माण करू."

जॉर्ज वॉशिंग्टनच्या चरित्राकडे पाहिल्यास या रूपकात्मक स्वप्नाचा अर्थ सहज ध्यानांत येण्यासारखा आहे. वीम्स नांवाच्या वॉशिंग्टनच्या चरित्रकारानें या स्वप्नाची मीमांसा केलेली आहे. मेरीची आपल्या मुलासबधीची महत्त्वाकांक्षाच जणु या स्वप्नांत फलास आलेली होती; आणि हें 'स्वप्न' पुढें खऱ्या अर्थानें जेव्हां तिच्यापुढे उभें राहिलें, जेव्हां वॉशिग्टनचा सर्वत्र गौरव होऊन तो पहिला अध्यक्ष म्हणून निवडला गेला तेव्हा मेरी वॉशिंग्टनला कोण धन्यता वाटली असेल ?

आपल्या मुलाला सर्व कर्तृत्वाचा वारसा देऊन मेरी वॉशिग्टन वयाच्या ८३ व्या वर्षी मरण पावली. फ्रेड्रिक्सबर्ग येथें ती ज्या स्थानावर ध्यानधारणा आणि प्रार्थना करीत असे तेथेंच तिचा अत्यविधि करण्यांत आला. नंतर पुष्कळ वर्षेपर्यंत त्या ठिकाणी कोणतेहि स्मारक नव्हतें. परतु सन १८३३ मध्यें तिच्या स्मारकाची कल्पना निघाली. या वर्षीच्या मे महिन्याच्या सातव्या दिवशी अमेरिकेचा अध्यक्ष जॅक्सन याने या स्मारकाची कोनशिला बसविली. पंधरा हजारावर लोक उपस्थित होते. या प्रसंगीं प्रेसिडेंट जॅक्सननें केलेलें भाषण मननीय होतें. मेरीचा गौरव करतांना त्यानें उद्गार काढले:

" माझ्या समोर जें स्मारक आहे ते जॉर्ज वॉशिंग्टनच्या आईचें आहे. तिच्या नांवानें जो स्मृतिस्तभ आपण उभारीत आहों, त्यावर ' वॉशिंग्टनची आई मेरी' अशी साधी पण अर्थपूर्ण अक्षरें लिहिली आहेत. यापेक्षां अधिक उचित शब्द नाहीत....ही मातापुत्राची जोडी अवर्णनीय अशी आहे. मातृप्रेमाची व पुत्रप्रेमाची ही मूर्तिमंत आदर्शभूत चरित्रें आहेत आणि तीं आपल्या देशबांधवांनी मनन करावीत. मातेचें उच्च कर्तव्य कोणतें असतें व तें मेरी वॉशिंग्टननें कसें पार पाडलें हें या स्मारकावरून, मेरीच्या चरित्रावरून ध्यानांत येईल....ज्या ज्या वेळी एखादा प्रवासी या पवित्र स्थानाकडे येईल त्या त्या समयी जॉर्ज वॉशिटनच्या मातेचें उदात्त चरित्र त्याच्या डोळ्यांसमोर येऊन त्याचें मन कृतज्ञतेनें निश्चित भरून येईल."

*

# नेपोलियन बोनापार्ट

( १७६९–१८२१ )

युरोपचा विख्यात वीर व फ्रान्सचा कर्तबगार बादशहा म्हणून नेपोलियनचें नांव सर्व जगांत दुमदुमून राहिलें आहे. लहानपणापासून लष्करी शिक्षणाची मनस्वी आवड याला होती. आपल्या थांवपळीच्या आयुष्यांत यानें अनेक लढाया जिंकल्या. इटली, ईजिप्त, ऑस्ट्रिया इत्यादि देशांचा पराभव करून तेथें आपलें स्वामित्व प्रस्थापित करण्याची कामगिरी यानें केली. याची बुद्धि सर्वगामी असून राज्यकारभार, समाजनियमन, धर्मकारण, कायदा, युद्धकौशल्य व सेनापतित्व या सर्व प्रांतांत यानें अत्यत प्रभावी असें कार्य करून दाखविलें. सन १८०४ मध्यें नेपोलियन फ्रान्सचा बादशहा बनला. इंग्लंड, रशिया आदि दोस्तानीं याला १८१४ मध्यें एल्बा बेटांत हाकलून दिले. तेथूनहि तो निसटला आणि पुन: नव्यानें उद्योगास लागला; पण प्रसिद्ध अशा वाटर्लूच्या लढाईंत याचा पराभव झाला. सेंट हेलिना बेटांत याची रवानगी झाली. तेथेंच १८२१ मध्यें अत्यंत विपन्नावस्थेंत त्याला मरण आलें. पुढें फ्रान्समधील परिस्थिति पालटल्यावर १८४० मध्यें याचें शव मोठ्या स्वागतसमारंभानें फ्रान्समध्यें आणून त्याचा दफनविधि पुनः करण्यांत आला.

# ९ : : लेटीशिया बोनापार्ट

## ( १७५०—१८३६ )

एका अंधाऱ्या राहुटीत एक तरुण स्त्री आपल्या लहानग्या मुलास पाजीत बसली होती. भोंवतालच्या प्रदेशात मधून मधून कसला तरी गड-गडाट होत होता. स्त्रीची मुद्रा सचित होती. येवढी रात्र झाली तरी लढाई थांबली नाही की काय ? हा प्रश्न तिच्या मनात येत असावा. कदाचित् भोंवतालच्या अरण्यांतील जगली आणि क्रूर श्वापदाचाहि तो आवाज असावा. इतक्यांत तिला कोणाच्या तरी पावलाची चाहूल लागली. राहुटीचें दार झटकून एक शिपाईगडी आंत आला. त्या स्त्रीनें त्याचें स्वागत केलें. तिच्या ओठांवर अनेक प्रश्नांची गर्दी होऊ लागली. तरुणानें तिला फार वेळ शंकित अवस्थेंत ठेविलें नाहीं. तो आनदानें उद्गारला, " लेटीशिया, आपला जय होणार. उद्यां तह होऊन कॉर्सिका स्वतत्र राहील. " लेटीशिया हर्षानें बहरून गेली. आपली मुलें आतां फ्रेंचांच्या दास्यांत राहणार नाहींत याचा संतोष तिच्या चेहऱ्यावर चमकून गेला.

लेटिशिया कॉर्सिकन माता होती. पुढें हीच 'मॅडम मीर' या नांवानें प्रसिद्ध झाली. पुष्कळ मुलाची हौस कॉर्सिकन स्त्रीला स्वभावतःच असते. लेटीशियानें आपल्या आईपासून व आजीपासून पुष्कळ मुलांची माता व्हावें हेंच शिक्षण घेतलें होतें. घराणें चांगलें प्रतिष्ठित व श्रीमत असें होतें. लेटीशियाचा जन्म सन १७५० मध्यें झाला. ती रूपानें अतिशय सुंदर होती. तिची लांबट चिंचोळी हनुवटी तिच्या अगी असणाऱ्या अविरत कार्यशक्तीची साक्ष देत असे. तिच्या अगचें धैर्य तिच्या सरळ नाकावरून प्रगट होत असे. तिच्या वयाच्या तेराव्या वर्षी तिचें लग्न चार्लस बोनापार्ट नांवाच्या एका उमद्या तरुणाशी झालें. पंधराव्या वर्षी लेटीशियाला मुलगा झाला. त्याचें नांव जोसेफ होतें. तो अल्पायुषी झाला; तेव्हां नंतरच्या मुलाचें नांवहि जोसेफच ठेवलें होतें.

या मुलाच्या जन्मानंतर कॉर्सिका बेटांत धामधूम सुरू झाली. हें बेट इटाली देशाच्या जिनोव्हा या संस्थानाच्या अंमलाखाली होतें.

परंतु या वेळी तें फ्रेंचांच्या सत्तेखाली जात होतें. कॉर्सिकन लोकाना इंग्लडच्या वतीने हा चाललेला कारभार पसत नव्हता. कार्सिकनाचा पुढारी पेआली नावाचा होता. त्याच्या साह्यानें लोक फ्रेंचांशी लढत होते: आणि प्रारभी तरी पेआलीची सरशी होत राहिली, आणि हीच आनदाची बातमी चार्लस् बोनापार्टने आपल्या पत्नीस मोठ्या आनंदाने सांगितली. दोघानाहि स्वातत्र्याची भूक मनस्वी होती. नवऱ्याबरोबर मुलाला पाठीशी घेऊन लेटीशियानें अनेक वेळा कष्टदायक अशा डोंगराळ भागातून घोडदोड मारली होती. जातीची स्त्री पण पुरुषाच्या धैर्याची होती. तिच्या कमरेला सदैव एक खजीर खुपसलेला असे; न जाणों प्रसग बेतला तर भ्याडाप्रमाणे मरण नको, असा तिचा विचार असे.

पुढें पेआलीला यश येण्याची चिन्हें दिसेनात. सन १७६९ च्या सुमारास पुनः युद्धाचा भडका उडाला. कॉर्सिकन तरुणांनी शिपाईगिरीची शर्थ केली. लेटीशियाहि नवऱ्याबरोबर युद्धाच्या धामधुमीत असे. कॉर्सिकनांचा यावेळी पराजय झाला. घनदाट अरण्यात आणि अडचणीच्या डोंगरांत आश्रयासाठी म्हणून त्यांची धावपळ सुरु झाली. याच लोकात घोड्यावर स्वार झालेली, पाठीशी मूल बांधलेली लेटीशियाहि होती. परतु यावेळी ती अवघडलेली होती. तिला दिवस गेलेले असल्यामुळें घोडदौड मारणें कठीण झाले होतें. कशीबशी ती निवाऱ्याच्या स्थानी आली. इटालीच्या ताब्यांत असलेली कॉर्सिकन प्रजा आता अनिच्छेनें कां होईना फ्रेंच बनली होती.

१५ ऑगस्ट १७६९ हा दिवस उजाडला. लेटीशिया आश्रयासाठी म्हणून अॅजॅशिओ गावांत आली होती. या दिवशी सकाळी चर्चमध्ये जाऊन तिनें प्रार्थना केली; नतर लागलीच ती तातडीनें घरी आली, आणि पलंगावर पडून राहिली. पलंगावर प्राचीन पद्धतीचे वेलबुट्टीदार कापड अंथरलेलें असून त्यावर इलियडमधील शूर वीरांची चित्रे भरलेली होती. थोड्याच वेळांत तिनें एका मुलाला जन्म दिला. पुढें तीस वर्षेपर्यंत आपल्या अद्वितीय पराक्रमानें सबंध जगाला थक्क करुन सोडणारा नेपोलियन तो हाच!

नवऱ्याबरोबर युद्धावर जाणारी लेटीशिया आतां दोन मुलांची आई

होती. समुद्राकांठी असणाऱ्या आपल्या घरात तिनें मुलांचें संगोपन हेंच आपलें कर्तव्यक्षेत्र ठरवून घेतलें. घरांतील सर्व कामे स्वतःच करून तिनें आपला संसार मोठ्या काटकसरीने चालविला होता. चार्लस् खर्चिक आणि चैनी होता. त्यानंतर दिवसहि कठीण येत होते. सांपत्तिक स्थिति खालावली; यांतच एकामागून एक जन्मणाऱ्या मुलाची भर पडली. लेटीशियाला एकूण तेरा मुलें झाली. त्यांपैकी पांच अल्पायुषी ठरली. जोसेफ, नेपोलियन, लुसीन, लुई आणि जिरोम असे पांच मुलगे व एलिझा, कारोलाईन आणि पॉलीन अशा तीन मुली, एवढ्यांचे संगोपन लेटीशियाने मोठ्या तत्परतेनें केलें. या खानदानी कुटुंबाला फार गरिबीचे दिवस आले. तशात सन १७८२ मध्यें चार्लस बोनापर्ट याचा मृत्यु झाला, आणि सर्व संसाराचें ओझें एकट्या लेटीशियावर येऊन पडलें.

परंतु या खंबीर मनाच्या धैर्यवान् मातेनें आपल्या मुलांना चांगली शिस्त लाविली. उत्पन्नाची बाब कांहींच नव्हती. लेटीशिया सर्व कामें स्वतःच करी. या मुलांचे कपडे घरींच शिवतां शिवतां तिचे खांदे आणि बोटें दुखून येत. जोसेफ व नेपोलियन फ्रान्समध्ये शिकत असत, त्यांचे कपडेहि ती घरूनच तयार करून पाठवी; आणि तेवढाच खर्च वांचवी. परिस्थितीमुळें निर्माण झालेला हा काटकसरी स्वभाव तिच्या अंगी शेवटपर्यंत तसाच होता. मुलगा फ्रान्सचा बादशहा झाला तरी घरात लोणी फार लागते, वाड्यांत मेणबत्त्या फार जळतात म्हणून हिची तक्रार असावयाची. सर्व युरोपला थरथरा कांपावयास लावणारा नेपोलियन फ्रान्सचा बादशहा झाला तेव्हां लेटीशियाच्या सर्व कष्टांचें आणि सर्व आपेष्टांचें सार्थक झालें. पॅरिसला आपल्या मुलाजवळ शांततेनें दिवस घालवीत ती मुलांचा उत्कर्ष पहात होती. दहा लाखांचा वार्षिक तनखा नेपोलियन आपल्या आईसाठी देत असे. तरी लेटीशिया अति काटकसर करी. लोक तिला चिक्कू म्हणत, त्यावेळी ती गंभीर स्वरांत सांगे; "आम्ही कार्सिकनांनी मोठ्या क्रांतीतून दिवस घालविले आहेत. या समोर दिसणाऱ्या वैभवाबद्दलहि कोणी सांगावें? एके दिवशी क्षणांत हें नाहीसें होईल आणि मग माझ्या लेकरांनी कोणाच्या

तोंडाकडे पहावें ? फसव्या आणि दगलबाज मित्रांच्या आश्रयार्थ जाण्याऐवजी त्यांनी आपल्या आईच्याच आश्रयास यावें."

लेटीशियाला जणू सारें भविष्य समजलें होतें. भरभराटीस असलेलें मुलांचें राजवैभव पाहतां पाहतां तिच्या मनांत कोठें तरी खुपत राही. लेटीशिया नेहमी म्हणे, "मागचेच दिवस सुखाचे होते. लोक म्हणतात की माझ्यासारखी भाग्यवान माता नसेल. परतु खरें पाहतां असें आहे की माझ्याइतकें दुःखी कोणीहि नसेल. हरघडी, युद्धाची बातमी ऐकतांना, माझा मुलगा तर नाहीं ना दगावला, असा चरका माझ्या चित्तास बसतो." भाबड्या मातेच्या हृदयांत सदैव मुलांची चिंता होती. स्वतः नेपोलियनहि कधीं कधी आईला विचारी,

" हें वैभव तुला त्रासदायक वाटतें का आई ? पहा तुझी मुलें, तुझ्या मुली, कशा विलासांत आणि ऐश्वर्यांत आहेत. तू पैसा का जपून ठेवीत आहेस ? सढळ हातांनी खर्च करीत जा ना !"

आणि लेटीशिया यावर म्हणे; " हं; तू मला दहा लाखांऐवजीं वीस लाख देत जा म्हणजे बघेन जमलें तर ऐश्वर्यांत रहाणें...पण माझा स्वभावच काटकसरीचा आहे. "

आईचा हा काटकसरीचा स्वभाव नेपोलियनास पुढच्या आयुष्यांत फारच उपयोगी पडला.

लेटीशियाचा वचक आपल्या सर्व मुलांवर असे. मुलें आपल्या आईस फार मान देत असत. विशेषतः नेपोलियनला तर आपल्या मातेचा महिमा फारच मोठा वाटे. आपलें बुद्धिवैभव, शारीरिक सामर्थ्य आणि नैतिक वागणूक या गोष्टी आपल्या मातेकडून आल्या आहेत असें तो नेहमीं म्हणे. शेवटी नेपोलियननें असा सिद्धांतहि बांधला कीं, My opinion is that the future god or bad conduct of a child depends entirely upon its mother.( कोणत्याहि मुलाचें पुढील बरें वाईट भवितव्य सर्वस्वी त्याच्या आईवर अवलंबून असतें. ) आणि तो जेव्हां फ्रान्सचा सर्वाधिकारी झाला तेव्हां याच सिद्धान्तास अनुसरून त्यानें फ्रान्समध्यें जारीनें स्त्रीशिक्षणाची व्यवस्था केली.

आईच्या मुखांतून नेपोलियननें अनेक शौर्याच्या कथा ऐकल्या होत्या.

वडिलाबरोबर आईनें कोणकोणती दुःखे युद्धकाळांत भोगली, कौर्सिका-नांच्या पराजयानतर या गावाहून त्या गावी ती कशी आश्रयार्थ भटकत होती, तिला उपास कसे पडत असत इत्यादीची रसभरीत वर्णनें लेटीशिया आपल्या मुलासमोर करीत असे, यामुळें मुलाच्या मनात स्वातन्त्र्याचें प्रेम आणि युद्धगिरीची आवड सहजच निर्माण झाली. लेटीशियात अनेक प्रकारचे दैवी गुण होते. या तरुण मातेने मुलाच्या वडिलानतर त्याना योग्य शिक्षण देऊन अतुल सामर्थ्यवान् बनविले. लेटीशियाचे हे कर्तृत्व अॅबटनें फार सुंदर रीतीनें वर्णन केलें आहे. लेटीशियानें छोट्या नेपोलियनला अनेक वेळां माडीवर घेऊन कुरवाळले असेल, त्याच्या मऊ मऊ हाताचें कौतुक केलें असेल, आणि पुढें याच हातांतील तळपणाऱ्या खड्गामुळें साऱ्या जगास धक्का बसला. लेटीशियाने चिमुकल्या ओठातून 'पपा', 'ममा' असे शब्द काढावयास नेपोलियनला शिकविलें असेल; आणि त्याच मुखांतून नेपोलियनने पुढें सबध युरोपला भराभरा हुकूम सोडले. लढाईच्या मैदानावर याच मुखांतून हजारोंच्या सैन्याला आज्ञा सोडल्या. लेटीशियानें गोड पाप्याचे आश्वासन देऊन लहानग्या नेपोलियनास छोट्या छोट्या पायांनीं चालण्याचे धडे दिले असतील, त्याच पायांनी नेपोलियननें मोठेपणी ईजिप्त, रशिया, ऑस्ट्रिया, इटली इत्यादि देशावर स्वाऱ्या करून सबध युरोपांत दिग्विजय केला. नेपोलियनच्या आईचें कर्तृत्व हें असें होतें.

आपल्या जन्मदात्रीबद्दल नेपोलियनला केवढा अभिमान होता. कधीं कधीं तो म्हणे, "माझ्या आईच्या डोळ्यातून दुःखाश्रूचा एक थेंब जरी पडला तरी पृथ्विप्रलय झाला असेंच मी मानीन." आईसाठी नेपोलियननें अनेक गोष्टी केल्या. लेटीशिया मोठी धार्मिक वृत्तीची बाई होती. फ्रान्स-मधील राज्यक्रांतीचे वेळीं धर्मास फार वाईट दिवस आले. मदमत्त झालेल्या लोकांनी पवित्र धर्मग्रथ पायाखाली तुडविले. बायबलाच्या प्रतीचा नायनाट केला. देवधर्माचे नांवहि कोठें उरलें नव्हतें. परतु नेपोलियनच्या हातांत सत्ता आली आणि सर्व देखावा पालटून गेला. आईची आवडती गोष्ट नेपोलियननें केली. मोडकी पडकी देवळें परत बांधली गेलीं आणि परमेश्वराच्या प्रार्थना सुरू झाल्या. चर्चमधील घंटांचे निनाद कित्येक

दिवसांनंतर फ्रान्समध्यें घुमू लागले आणि स्वतः बादशहा आईला घेऊन दर रविवारी चर्चमध्यें जाऊं लागला. पुत्राचा प्रताप पाहून लेटीशियाचे डोळे तृप्त झाले आणि पहिल्याच दिवशी हर्षभरित होऊन ती आपल्या कर्तृत्ववान् मुलास म्हणाली;

" हें छान केलेंस. बाळा, शाबास तुझी! तूं स्वतः आपण होऊन माझे-बरोबर प्रार्थनेस आलास. आतां माझे कष्ट तरी वांचले. कारण तुझ्या लहानपणी तुझा कान धरून प्रार्थनेसाठीं आणावें लागत होतें. " नेपोलियन मनापासून हंसला. आपल्या आईच्या चेहऱ्यावरील प्रसन्नता पाहून तो खूष झाला होता.

नेपोलियनच्या यशाची चढती कमान लेटीशियानें कौतुकानें पाहिली. नेपोलियन उत्कृष्ट सेनानी होता. पुढें तो फ्रान्सचा पुढारी झाला. राजा आणि अधिराजा अशा चढत्या क्रमाचें यश त्याला प्राप्त झालें. इजिप्त, इटाली, ऑस्ट्रिया इत्यादि देशाचे सम्राट त्याच्या पदीं लीन झाले. नेपोलियनचें सामर्थ्य कळसास पोंहचलें. अत्युच्च वैभवावर असताना नेपोलियनला कोणी विचारलें, " महाराज, या सर्वांत आपणास आनददायक असा कोणता दिवस वाटतो ? " नेपोलियननें ताडकन् उत्तर दिलें, " ज्या दिवशी इजिप्तचा जय मिळवून जयघोषात मी परत आलों त्या वेळी आईच्या नेत्रात आनदाश्रु जमलेले मी पाहिले. हा दिवस मी कधीहि विसरणार नाहीं. " दर स्वारीवरून परत आल्यावर नेपोलियन आपल्या आईस भेटत असे. एके प्रसगी विजयानतर तो आपल्या आईस भेटावयास आला. त्याला पाहताच आई बोलली, " नेपोलियन , फार खराब दिसते प्रकृति तुझी ! प्रकृतीची काळजी घेत जा ना ! "

" छे, छे, आई, ममतेमुळें तुला मी खराब झालेला दिसतों. मी तर आतां खरं जीवन जगत आहें. "

आणि आपल्या आईसच तो म्हणाला, " आई, तूं मात्र आपल्या प्रकृतीस फार जप. तूं आहेस तोंपर्यंत माझ्यावर फार मोठें कृपाछत्र आहे."

आणि नेपोलियनची इच्छा पूर्णपणें फळास आली. शेवटपर्यंत नेपोलियनला आईचें पाठबळ होतें. पुत्राचा उत्कर्ष तिनें पाहिला तसा त्याचा

शोकदायक अतहि तिला पहावा लागला. नेपोलियनचें दैव फिरलें, त्याचे मित्र आणि साथीदार शत्रु बनले, आणि नेपोलियनला राज्यलक्ष्मी सोडून १८१४ सालीं एल्बा बेटांत जाऊन राहावें लागलें. त्या छोट्याशा बेटाचा तो संपूर्ण मालक बनणार होता. फ्रेंच सरकारकडून त्याला सालीं वीस लक्ष फ्रांक मिळणार होते. नेपोलियन या बेटांत फार तर दहा महिनेच होता. पण तेवढ्या अवधीत त्यानें त्या बेटाचें स्वरूप पार बदलून टाकलें. तेथें अनेक सुधारणा त्यानें केल्या. या वेळी लेटीशियाहि त्याचे बरोबर होती. तिच्या मनाला या ठिकाणी पुष्कळच स्वस्थता लाभली. कारण तिच्या मुलाला आता युद्धाच्या यातना होणार नव्हत्या. झाला येवढा पराक्रम खूप झाला. आतां त्यानें आयुष्य शाततेंत घालवावें असें तिला वाटे. एल्बा बेटात तशी शांतता आणि तसें स्वास्थ्य भरपूर होतें. लेटीशियाला वाटे, जणूं हें कॉर्सिकाच बेट आहे. दररोज मुलाशी बातचीत करतांना तिला पूर्वीच्या अनेक सुखद स्मृती होत असत. आजपर्यन्त काटकसर करून तिनें मोठी सपत्ति जतन केली होती. आतां तिचा खर्च तिच्या लाडक्या मुलांसाठी होणार होता. ती मोठ्या खुशीत होती. ' सर्व कांहीं आपणास आतां मिळाले ' या समाधानांत ती होती. परंतु दुर्दैवाचा कठोर आघात तिच्या कपाळी लिहिलेला होता हें तिला उमगलें नाहीं. नेपोलियनचें कारस्थान सुरू होतें. अंतस्थ हेर फ्रान्समधील सर्व घडामोडी त्याला सांगत होते. आकाशात भरारी मारणाऱ्या या गरुडाला पिंजऱ्यांतील हें जीवन असह्य झालें, आणि पुनः एकदां उठाव करण्यासाठीं तो एल्बा बेटांतून निसटण्याच्या विचारास लागला. एके रात्री त्यानें आपलें गलबत गुप्तपणें सजवलें. कोणासहि त्यानें थांगपत्ता लागू दिला नाही. जातांना तो आपल्या आईकडे फक्त आला, संध्याकाळचा समय होता. आई एकांतांत बागेंत एका झाडाखाली बसलेली होती. आईच्या मस्तकावर हात ठेवून तो बोलला;

" आई, तुला एक बातमी देणार आहें. कोणालाहि कळवूं नकोस. " आणि किंचित् मागें सरकून त्यानें सांगितलें, " मी आज रात्रीं एल्बा बेट सोडणार आहें. " आईनें चकित होऊन विचारलें ' आं ? का रे बाबा ? आणि जाणार तरी कुठें ? " नेपोलियननें उत्तर केलें;

" पॅरिसला. आई तुझा आशीर्वाद पाहिजे मला. "

क्षणभर लेटीशिया स्तब्ध झाली. तिचें आतां वय झालें होतें. तिला ही बातमी धक्का देणारी होती. आतां सर्व स्वास्थ्य संपणार, पुनः चिंता, पुनः दगदग,...तिला नको होतें हें जीवन. परतु लेटीशिया आपल्या पुत्रालाहि ओळखत होती. नेपोलियनच्या मनात आलें की तें हटकून व्हावयाचेंच असा सिद्धांत होता. शेवटी लेटीशिया कंपित स्वरात बोलली,

" तुझ्या दैवांत असेल तसें परमेश्वर घडवील. म्हातारपणी तू शांततेनें प्राण सोडावास अशी त्याची इच्छा दिसत नाही. हातांत तरवार असतांनाच तुला मरण येणारसें दिसतें. जा परमेश्वर तुझें रक्षण करो. "

आणि नेपोलियन एल्बा बेटातून निघाला. पुनः एकदां त्यानें फ्रान्स-मध्यें आपला दरारा बसविण्याचा प्रयत्न केला. प्रसिद्ध अशी वाटर्लूची लढाई झाली व नेपोलियनचें सर्व वैभव नष्ट झालें. इंग्लंड, रशिया, ऑस्ट्रिया इत्यादि दोस्तांनी त्याला कैद केलें; आणि त्याची सेंट हेलिना बेटांत रवानगी झाली. जवळजवळ अर्धे शतकपर्यंत गर्जना करणारा हा सिंह सांपळयांत अडकला गेला. तेथेंहि त्याची गुरगुर चालूच होती. पण तिचा उपयोग होण्यासारखा नव्हता. अत्यंत हालांत नेपोलियनला तेथें दिवस कंठावे लागले.

शेवटपर्यंत नेपोलियन मातृभक्त राहिला. येथें आणखी एक हकीगत सांगण्यासारखी आहे. नेपोलियनचें आईवर जसें प्रेम होतें तसेंच त्याच्या उपमातेवर, दाईवरहि त्यानें मनापासून प्रेम केलें. वर्षाआड सारखा पाळणा घरांत असल्यानें लेटीशियाला कोणत्याहि मुलास दोन वर्षेपर्यंत अंगावर पाजणें शक्य झालें नाही. म्हणून एक दाई ठेवण्यांत आली होती. तिचें नांव होतें कामिला लारी. इजिप्त-इटाली देश जिंकून नेपोलियन पॅरिसला आला तेव्हां मोठमोठ्या लोकांनी त्याचा सत्कार चांगला केला. मेवामिठाई फळफळावळ, हारतुरे, दागदागिने या देणग्यांचा नुसता वर्षाव झाला. गरीब कामिला लारी नेपोलियनला काय देणार ? पण त्या गर्दीत ती वाट काढण्याचा प्रयत्न करीत होती. शेवटी कशीबशी नेपोलियनपाशी जाऊन ती भिडली; आणि बरोबर आणलेली दुधाची बाटली त्याचेपुढें धरून ती

बोलली; " माझ्या लाडक्या, मला ओळखलें नाहीस तूं ? तुझ्या लहानपणीं मी माझ्या स्तनांतील दूध तुला पाजिलें. आतां तूं मोठा झालास आणि मी पण म्हातारी झालें....यावेळीं मी माझ्या पाळीव बकरीचें दूध आणलें आहे, तेवढें पी. मला मोठा आनद होईल." कामिला लारीचे शब्द ऐकून नेपोलियन सद्गदित झाला. त्यानें तें दूध आधाशाप्रमाणें पिऊन तृप्तीचा ढेकर दिला. याच दाईच्या गळ्यात पुढें राज्याभिषेकाच्या वेळी नेपोलियननें एक रत्नहार घालून तिचा गौरव केला.

असा हा नेपोलियन बादशहा सेन्ट हेलिना बेटांत आपल्या आईची स्मृति करीत होता, आणि इकडे लेटीशिया पोपच्या आश्रयास रोम येथें येऊन नेपोलियनच्या सुटकेचा प्रयत्न करीत होती. नेपोलियनला ती पत्रेंहि लिहीत होती; पण तीं त्याला सहसा पोंचत नसत. लिहिल्यानंतर एक वर्षानें पोंहचलेल्या पत्रांत ती म्हणते, " मी आतां म्हातारी झालें आहें. तुझ्याकडे यावें म्हटलें तर पाच हजार मैल लांबीचा प्रवास मला सोसवणार नाही. पण मरण्यासाठी मी तुझ्या जवळच येत आहें. कदाचित् वाटेंतच माझा अंत होईल." पत्र वाचून नेपोलियनचा गळा दाटून आला. ' माझे हे हाल पाहण्यास आईनें येऊ नये ' असा निरोप त्यानें पाठविला.

आपल्या मुलास सोडविण्याचा सारखा प्रयत्न लेटीशियाचा सुरू होता. त्याच्या सुटकेसबधी दोस्तांना लिहिलेले तिचें पत्र अत्यंत करुणरम्य आहे. सन १८१८ मध्यें ती त्याना लिहिते,

" वार्धक्यानें आणि पुत्रवियोगाच्या दुःखानें खगून गेलेली एक आई आपणास पत्ररूपानें तिचा प्राण परत मिळावा म्हणून विनति करीत आहें. तुम्ही परमेश्वराचेच प्रतिनिधि आहात; तुम्हालाच मी प्रार्थना करतें." पण तिच्या या पत्राला उत्तर कोण देणार ?

सेन्ट हेलिना बेटांत नेपोलियनचें अधिकाऱ्यांशी थोडें भांडण झालें. त्यानंतर एक वर्षभरपर्यंत कोणीहि डॉक्टर त्याचेजवळ नव्हता. बेटांतील अतिशय वाईट हवेमुळें त्याची प्रकृति झपाट्यानें खालावली. पोटशूळाची व्यथा बळावली. हें लेटीशियाला समजल्यावर तिनें त्याच्यासाठी एक कॉर्सिकन डॉक्टर हेलिना बेटाकडे रवाना केला. त्याचें नांव अन्टोमार्की

असें असून त्याचेबरोबर दोन उपाध्याय, एक गडी आणि एक स्वयंपाकी-हि पाठविण्याची व्यवस्था तिनें केली होती. अन्टोमार्की पाहतांच नेपोलियनला भरतें आलें. कित्येक वर्षात न समजलेल्या आईकडील हकगती समजणार होत्या. मोठ्या तन्मयतेनें तपशीलवार हकीगत त्यानें कान देऊन ऐकली. सन १८२१ च्या मे महिन्याच्या पहिल्या दोन दिवसांत नेपोलियनची प्रकृति फारच बिघडली. त्याने निरवानिरव करण्यास सुरुवात केली. आपल्या भावांना, बहिणींना, मुलाला आणि उपयोगी पडलेल्या सर्व सहकऱ्यांना कायकाय द्यावयाचें तें त्यानें ठरवून टाकलें. आपल्या वृद्ध मातेसाठी त्यानें आपला चांदीचा दिवा लिहून ठेवला. याच दिव्यासन्निध सेंट हेलिना बेटांत त्यानें किती तरी रात्री आईच्या चिंतनांत जागून काढल्या होत्या! शेवटी मेच्या पांचव्या तारखेस तो बेशुद्ध झाला. त्याला घरघर लागली. त्या दिवशी मोठेंच वादळ झालें. पावसाचा वर्षाव होऊन विजा चमकत होत्या. सायंकाळी पांच वाजून ४९ मिनिटांनी त्याचें निधन झालें! हडसन लो म्हणून ब्रिटिश अधिकारी होता. अत्यत निर्दय-तेनें तो या वेळीहि वागला. नेपोलियनचें पोट चिरण्यांत येऊन आंतडीं बाहेर काढण्यांत आली. त्यांची रवानगी इंग्लंडला झाली. नंतर नऊ तारखेस दफनविधि झाला.

सर्व नाट्य संपलें होतें. बरोबरची मडळी आपापल्या देशी निघून गेली. कॉर्सिकन डॉक्टर अन्टोमार्की इटालीत आला. नेपोलियनचे बंधु किंवा त्याची दुसरी बायको मेरी ल्युईस यांपैकी कोणीहि त्याला भेटले नाहीत, कीं कोणी बादशहाची चौकशी केली नाहीं. रोम येथें सत्तरी उलटून गेलेली लेटीशिया आपल्या दुर्दैवाचे दशावतार पाहण्यास जिवत होती. नेपोलियन केव्हांतरी सुटेल आणि येऊन भेटेल ही तिची आशा होती. तिच्या देखत तिच्या दोन मुली वारल्या. कित्येक नातवडांचेहि मृत्यु तिनें पाहिले. तिचें एक अंग अर्धांगवायूनें विकलित झालेलें असून तिला डोळ्यांनीं दिसत नव्हतें. तरी नेपोलियनच्या पुतळ्याकडे पहात ती जगून राहिली होती.

ॲन्टोमार्की लेटीशियास भेटावयास आला. मातृहृदयाचा सर्व उमाळा

तिच्या अंतःकरणांतून फुटून बाहेर आला. पुत्राची दुःखद मृत्युकथ सविस्तरपणें तीन दिवसपर्यंत म्हातारी ऐकत होती. नेपोलियननें दिलेल चांदीचा दिवा तिनें पाहिला; आणि ती क्षणभर स्तब्धच झाली.

नेपोलियन सन १८२१ मध्यें मृत्यु पावला. लेटीशिया यानंतर पंधर वर्षें जगली. नेपोलियनप्रमाणेंच तिनें आपल्या मौल्यवान वस्तु आपल्य विश्वासू आणि कृतज्ञ नोकरांना देऊन टाकल्या. नेपोलियनच्या मृत्यूनंतर नऊ वर्षांनी म्हणजे १८३० च्या नतर फ्रान्समधील सर्व परिस्थिति पाल टून गेली. नेपोलियनचा छळ करणारें बर्बोन घराणें नाहीसें होऊन लु फिलीप गादीवर आला. जनतेंतहि नेपोलियनबद्दल पुनः अलोट प्रेम निर्माण झालें. १८३१ च्या ८ जुलैला नेपोलियनाचा पुतळा सन्मानपूर्वक योग्य त्य स्थानी परत बसविण्याचा सरकारी हुकूम निघाला आणि थोड्याच अवधीत मोठ्या समारभानें ज्या स्थानावरून पूर्वी तो हुसकावून लावला होता त्याच स्थानावर मानानें येऊन बसला! अथरुणावर खिळलेल्या लेटीशियास ही बातमी तिच्या धाकट्या मुलानें, जिरोमनें सांगितली मात्र, मरणाच्य पंथाला लागलेल्या त्या मातेस पुनः अवसान आलें. कित्येक दिवसांत तिनें अंथरूण सोडलेलें नव्हतें. परतु या वेळी इतक्या दिवसांत प्रथमच अल्लड पोरीप्रमाणे दिवाणखान्यातून ती नेपोलियनच्या पुतळ्यापाशी आली आपल्या आंधळ्या डोळ्यांना दृष्टि आल्याप्रमाणें भासून फोटोकडे पहात ती उद्गारली; "बादशहा पुनः एकदां पॅरिसमध्यें आला तर!"

या दुर्दैवी मातेचा अंत १८३६ मध्यें झाला. त्या वेळी तिचें वय ८६ वर्षांचें होतें.

# जोसेफ मॅझिनी

( १८०५–१८७२ )

इटलीला स्वातंत्र्योन्मुख करणारा एक थोर देशभक्त व ग्रंथकार म्हणून जोसेफ मॅझिनी जगांत ओळखला जातो. सतत चाळीस वर्षें-पर्यंत युरोपमध्यें राजकीय चळवळ करणारा क्रान्तीवीर म्हणून याचा लौकिक आहे. १८३० मध्यें इटलीतून हद्दपार झाल्यानतर फ्रान्स-मध्यें 'तरुण इटली' या नांवाची संस्था यानें स्थापन केली. याचें बहुतेक आयुष्य हद्दपारींत व कारागृहांत गेलेले आहे. १८३७ च्या सुमारास इंग्लिश राष्ट्राची सहानुभूति मिळविण्याची खटपट यानें केली. १८४८ च्या क्रान्तीच्या वेळीं तो परत इटलीला आला. कान्हूर व गॅरिबाल्डी यांनाहि त्यानें मनापासून साह्य केलें. इटलीचें संयोगी-करण झाल्यानंतर याचें कार्य सपले. परंतु त्याच्या कल्पनेप्रमाणें लोकसत्ताक राज्याच्या योजनेनुसार इटलीचें संयोगीकरण झालें नाहीं म्हणून याची निराशा झाली. त्याचें उत्तर आयुष्य लंडन येथेंच गेलें. १० मार्च १८७२ या दिवशीं मॅझिनीचें निधन झालें.

"व्यक्तीच्या, कुटुंबाच्या, समाजाच्या व मनुष्यजातीच्या सर्व प्रकाराच्या उन्नतीचें मुख्य साधन जें राजकीय स्वातंत्र्य तें संपादन व संरक्षण करणें हें आपले प्रथम कर्तव्य आहे." हा मॅझिनीचा दिव्य संदेश सबंध इटलींत चैतन्यदायी ठरला.

# १० : : मराया सिग्नोरा मॅझिनी

( –१८५२ )

"माझ्या अंगीकृत कार्याला यश आलें आहे व स्वतंत्र इटलीबद्दल विचार करतांना माझ्या मातेचें हृदय आनंदाने भरून आलें आहे. अशा प्रसंगी मी तिच्या मुद्रेकडे पहात आहें: हें सुखस्वप्न मी माझ्या मनःश्चक्षू-समोर कितीतरी वेळां रंगविलें होतें."

इटलीच्या स्वातंत्र्याचा जनक जोसेफ मॅझनी याच्या जीवितात हेंच एक स्वप्न त्यानें रंगविलें होतें. पण ते स्वप्न सफल झालें नाही. सन १८५२ मध्यें आई मृत्यु पावली तेव्हा मातृभूमीच्या ठिकाणीच मॅझिनीनें आपल्या आईचें रूप कल्पून तिचें चिंतन शेवटपर्यंत केलें.

जोसेफ मॅझिनीच्या आईचें नांव मराया सिग्नोरा. ही रूपानें फार सुंदर व तीक्ष्ण बुद्धीची होती. तिचा स्वभाव अत्यंत ममताळु असून तिच्या नैतिक सामर्थ्यांचा व निष्ठाशक्तीचा जोसेफला फारच उपयोग झाला. इटली देश पारतंत्र्याच्या अंधारांत खितपत पडला होता. छोटी छोटी राज्यें युरोपीय बड्या राष्ट्रांनी इटलीत चालविली असल्यानें राष्ट्रीयतेच्या भावनेचा सर्वत्र अभाव होता. सबंध युरोपभर युद्धें, लढाया, मारामाऱ्या यांचा सुकाळ होऊन अंदाधुंदीचे साम्राज्य सगळीकडे पसरलेले होतें. अशा प्रसंगी इटली देशाला स्वाभिमानाची जाणीव करून देऊन त्याच्यात स्वातंत्र्यप्रेम निर्माण करणारा इटलीचा मुत्सद्दी वीर जोसेफ मॅझिनी हा इटलीच्या राज्यक्रांतीचा जनक समजला जातो. अशा प्रकारच्या विख्यात क्रांतिवीराला जन्म देऊन मॅझिनी धन्य झाली आहे.

मराया त्या वेळच्या मानानें चांगलीच सुशिक्षित होती. तिच्या नवऱ्याचें नांव डॉक्टर गायकोमो मॅझिनी असें असून तो जिनोआ येथील विद्यापीठांत शरीरशास्त्राचा प्राध्यापक होता. सन १८०५साली जूनच्या २२व्या तारखेस जिनोआ शहरी स्टॅडा लोमेलिनी येथे जोसेफ मॅझिनीचा जन्म झाला. याच्या आधी मरायाला दोन मुली झाल्या होत्या. रोझा आणि अँटोनिएट अशी त्यांची नांवें होती. परंतु जोसेफच्या जन्मापासून मरायाचा सर्व जीवितक्रमच

बदलून गेला. जोसेफच्या काळजीत व त्याच्या संवर्धनांत तिचा सर्व वेळ जाई. लहानपणी जोसेफ फारच नाजुक प्रकृतीचा व कोंवळ्या मनाचा होता. पांचसहा वर्षांचा होईपर्यंत त्याला धड पावलेंहि टाकतां येत नव्हतीं. त्याच्या वयाची मुले साऱ्या घरांत धुडगूस घालीत, पण हा मात्र सथपणें आपल्या आईच्या खोलीत एका आराम खुर्चीत स्वस्थ पडून असे. त्याच्या वडिलांना वाटे हा रडतराऊत कसचें शिक्षण घेणार ? त्याच्यावर कोणत्याहि शिक्षणाची जबरी करावयाची नाही; असें डॉ. गायकोमोंनी ठरवून टाकलें. मुलाच्या या अशा नाजुक प्रकृतीमुळें मरायाचे सारें लक्ष त्याच्याकडेच गुंतून राही. तिच्या सर्व भावना या दुबळ्या मुलावर केंद्रित झाल्या होत्या.

परंतु जोसेफनें थोड्याच वेळांत आपल्य बुद्धिसामर्थ्यानें आईला चाकित केलें. रोज सकाळी मुलींना शिकविण्यासाठीं शिक्षक येत असत. रोझा व अँटायनेटला दिलेले धडे जोसेफनें खुर्चीवर बसल्याबसल्याच पाठ करून टाकले. त्याला घडघडा वाचतां येऊ लागल्याचें पाहून मरायास अवर्णनीय आनंद झाला. सणावाराला इतर मुलें नाना तऱ्हांच्या रंगीत खेळण्यांसाठीं हट्ट धरून बसत; पण जोसेफ मात्र पुस्तकासाठी आईला सतावून सोडी. बिछान्यावर पडून वयाच्या पांचव्या वर्षापासूनच स्वारी पुस्तकवाचनांत गुंग होत असे; किंवा एखादा नकाशा समजावून घेण्याचा त्याचा प्रयत्न चालू असे. एकदां मरायाचा चुलत भाऊ तिला भेटावयास आला होता. जोसेफचें बालवयांतील हें पांडित्य पाहून त्याला पराकाष्ठेचें कौतुक वाटलें. 'लिलिपट येथील तत्त्ववेत्ता' अशी पदवीहि त्यानें जोसेफला देऊन टाकली. डॉ. गायकोमोनीं जरी याच्या शिक्षणासबंधी फारशी आशा ठेवली नव्हती, तरी मरायाच्या मातृदृष्टीला मुलाचें सुप्त सामर्थ्य समजून आलें होतें. तिनें आपल्या चुलतभावास जोसेफच्या शिक्षणासबधी विचारलें. तेव्हां त्यानें कळविलें, "मराया, हा तुझा मुलगा विद्येनें प्रतिसूर्य होईल; आणि आपल्या तेजानें सर्व युरोप खंडास चकित करून सोडील....आपल्या शतकाचें नांव अजरामर करण्यासाठी असली नररत्नें निर्माण होतात. तूं पाहिजे त्या आपत्ती सहन कर पण जोसेफला विद्या देण्याचें तुझें कर्तव्य आहे हें तू विसरूं नकोस." मरायानें या उपदेशाप्रमाणेंच जोसेफच्या शिक्षणाकडे लक्ष दिलें.

जोसेफचा स्वभाव जन्मतःच दयाळू होता. दारी आलेल्या भिक्षेकऱ्यांना भीक घातली म्हणजे याच्या चेहऱ्यावर समाधान चमकून राही. पांचसहा वर्षांचा झाल्यावर एके दिवशी मराया त्याला घेऊन घराच्या बाहेर हिंडण्यासाठीं म्हणून निघाली. जोसेफ स्वतःच्या पायांनी चालू लागला होता. याच दिवशीं एक विलक्षण गोष्ट घडून आली. एका देवळाच्या.पायरीवर एक म्हातारा भिक्षेकरी बसलेला होता. त्याची मुद्रा दीनवाणी होती, आणि कपडे फाटून गेले होते. छोटा जोसेफ त्याच्याकडे टक लावून पहात होता. मुलगा भेदरला म्हणून मरायानें त्याचेकडे लक्ष दिलें, तों मुलाच्या डोळ्यांत विलक्षण तेज आणि चेहरा कावराबावरा झालेला ! मरायानें झटकन त्याला उचलण्याचा प्रयत्न केला. पण चपळाई करून जोसेफ तिच्या हातून निसटला. धांवत जाऊन त्यानें त्या भिकाऱ्याच्या गळ्यास मिठी मारिली ! व आईजवळ " याला कांही तरी देच " असा त्यानें हट्ट धरला. लहानग्या मुलाचें हें कृत्य पाहून त्या भिकाऱ्याचें हृदय भरून आलें. त्यानें जोसेफला कुरवाळलें आणि मरायाकडे वळून तो म्हणाला, " बाई, या मुलाची जपणूक चांगली करा. हा मुलगा देशाचे पाग फेडील." मरायाचा या शब्दावर फारच विश्वास बसला आणि या श्रद्धेच्या जोरावर तिने जोसेफची जोपासना चालविली. पुढें अनेक वेळां आपल्या मैत्रिणीना व नातेवाइकांना तिनें ही गोष्ट मोठ्या अभिमानानें सांगितली.

नीतिमत्ता, दयाशीलता आणि सचोटी हे गुण जोसेफला आईकडून प्राप्त झाले. त्याचप्रमाणे देशभक्तीची ज्योतिहि मरायाच्या सान्निध्यांतच त्याच्या मनांत तेवत राहिली. खाजगी रीतीचें व जिनोआ विद्यापीठांतील त्याचें शिक्षण संपत आलें होतें. एकदां सन १८२१ च्या एप्रिल महिन्यांत तो मरायाबरोबर फिरावयास निघाला होता. लीटमॉडमधील बंड नुकतेंच मोडलें होतें, आणि दुःखीकष्टी झालेले कांही 'बंडखोर' केविलवाणा चेहरा करून रस्त्यांतून हिंडत होते. रस्त्यांतून मराया व जोसेफ चालले असतांना एका उंच मनुष्यानें त्यांना थांबविलें. त्याची मुद्रा पाणीदार व करारी दिसत होती. त्याच्या डोळ्यांत तेजाची चमक एकसारखी चमकत होती. निराश्रित बंडवाल्यांसाठीं मदत गोळा करण्याचें काम तो

करीत होता. आपला हात पुढें करून त्यानें मरायास विनाविलें, " इटालीतील हद्दपार झालेल्या देशवीरांसाठी कांही मदत..." मरायानें आपल्या रुमालांतील कांही पैसे त्याच्या हातांत टाकल्यावर तो निघून गेला. जाणत्या झालेल्या जोसेफनें विचारलें, " आई, कोण ग तो ? " मरायानें उत्तर दिलें " त्याचें नांव कॅप्टन रिनी. परवा बंड झाले ना ? त्याच्या अगोदर एक राष्ट्रसंरक्षक पलटण उभारली होती, तिचा हा अधिकारी होता."

जास्त सांगण्याची जरूरीच नव्हती. या प्रसंगामुळें मॅझिनीच्या चित्तांत विलक्षण खळबळ उडाली. त्याने आपल्या आत्मचरित्रांत म्हटलें आहे, " त्या दिवशी माझ्या मनांत एक अस्पष्ट विचार उत्पन्न झाला की स्वदेशाला स्वातंत्र्य मिळविण्यासाठी लढणें हेंच आपलें कर्तव्य आहे. माझ्या देशावर जुल्म होत आहे, तेव्हां त्या जुलमाचा प्रतिकार करण्याचें काम मलाच केलें पाहिजे. ही कल्पना त्या दिवशी माझ्या प्रथम ध्यानांत आली. तेव्हांपासून मी हें ध्येय जन्मभर माझ्यासमोर ठेवलें. " इटली देशास पारतंत्र्याचें सुतक आहे अशी कल्पना करून घेऊन मॅझिनी काळ्या रंगाचा सुती पोषाख धारण करू लागला. सदैव विचारांत मग्न राहणाऱ्या या पोराबद्दल मरायास फारच चिंता वाटू लागली.

पण मरायाच्या काय ध्यानांत की तिला जन्मभर हीच चिंता पोखरून काढणार आहे ! इटालीला बंधमुक्त करण्याच्या प्रयत्नात मॅझिनीला जवळ जवळ आयुष्यभर हद्दपार व्हावें लागलें, अनेक प्रकारचे कारावास भोगावे लागले, नाना तऱ्हाचा छळवाद सहन करावा लागला. नसते उद्योग करणाऱ्या या लेकासंबंधी डॉ. गायकोमोनी कोणतीहि दयामाया दाखविली नाही. परंतु हद्दपार होऊन कष्टांत दिवस कंठणाऱ्या आपल्या लाडक्या जोसेफला त्याची आई कशी विसरणार ? जोसेफचें मन वकिलीच्या धंद्यांत रमेना, म्हणून त्यानें स्वदेशप्रीति आणि वाङ्मय या आपल्या जन्मभर वांट्यास आलेल्या उद्योगाकडे आपलें मन वळविलें. पण त्याची ही कारवाई त्या वेळच्या सत्ताधाऱ्यांना कशी रुचणार ? कारबोनरी नांवाच्या राजकारणी संस्थेच्या मंडळीत जाऊन जोसेफ मिसळला. नवचैतन्याचा फैलाव इटालीत होण्याची ही वेळ होती. गुप्त पत्रें पोंचविणें आणि मिळ-

विणें या त्याच्या उद्योगांत मरायासुद्धां सामील होती. परंतु पोलिसांनीं मॅझिनीलाच अटकेंत ठेविलें. सॅव्होनाच्या किल्ल्यांत सहा महिन्यांची कैद त्याला भोगावी लागली. येथें असतांना दर दहा दिवसांनी त्याला आईकडून पत्र येत असे. या पत्रासबधी तो म्हणतो, " ही पत्रें दिसावयास अगदीं सरळ असत. पण प्रत्येक विषम शब्दाच्या पहिल्या अक्षरांचें एक वेगळेंच वाक्य तयार होत असे; आणि ते सुद्धा लॅटिन भाषेत !" युरोपमधील साऱ्या राजकीय घडामोडी मराया अपल्या देशाभिमानी मुलाला तुरुगातसुद्धां साकेतिक भाषेनें कळवीत असे आणि म्हणूनच एके ठिकाणी तिचा Minister for Foreign Affairs असा उल्लेख केला आहे.

यानतर त्याला मार्सेलिस येथें हद्दपार करण्यात आले, तरी त्याचे गुप्त कारभार बंद पडेनात म्हणून फ्रेंच सरकारने त्याची रवानगी स्वित्झर्लंडला केली. तेथील आल्पूस पर्वतांच्या रांगा पाहून त्याचें मन जरा रमत असे. " आईवर माझें जितकें प्रेम आहे तितकेंच या आल्पूस पर्वतावर आहे " असें तो म्हणत असे. तरी पण हद्दपारीच्या जीवनास मॅझिनी कंटाळून गेला होता. सर्व बाजूनी त्याच्या मनाचा कोंडमारा चालू होता. या बिकट प्रसंगी दारिद्र्याची झळहि त्याला पोळू पहात होती. परंतु जिनोआ येथून मराया या आपल्या दुःखित लेकाला हरतऱ्हेची मदत करीत होती. नवऱ्याच्या नकळत ही बाई कांही कपडे व पैसे मुलाकडे पाठवीत असे. लेकाचा स्वभाव तिला ठाऊक होता. असेल नसेल तें सर्व दुसऱ्यांना देऊन टाकण्यांत जोसेफला मोठें सुख वाटे, म्हणून आई दुप्पट तिप्पट कपडे पाठवून मुलाला मदत करीत राही. जोसेफने म्हटलें आहे; " आई, मी तुझ्याकडे पैशाची मागणी कितीदा करू ? आतां तर माझी मलाच शरम वाटूं लागली आहे. " परतु मरायानें त्याच्या मागणीचा कधीहि अव्हेर केला नाही. प्रिय इटलीच्या दर्शनाची ओढ एकसारखी त्याच्या अतःकरणास बोचत असे. स्वित्झर्लंडमधील हद्दपारीत माणसाचा सहवास दुर्मिळ झाला तेव्हां मॅझिनीची अवस्था फारच विचित्र झाली. आपल्या आवडत्या मांजरास खेळवीत तो आईची मूर्ति आठवीत असे. " आई, मला किती दुःख होत आहे म्हणून सांगूं ? ज्यांनीं ज्यांनीं माझ्यावर प्रेम केलें त्यांचेवर

मीं संकटांची परंपरा व दुःखाचे डोंगर मात्र कोसळविले! आई, तुझी आणि माझ्या बालपणीच्या सवंगड्यांची गांठ जेव्हां पडेल त्या दिवशी मी शांतपणानें प्राण सोडीन" असें त्याचें चिंतन एकसारखें चालू असे.

आईस होणाऱ्या दुःखाचीहि त्याला जाणीव होती. मरायानें त्याच्यावर फारच जीव लावला होता. आणि हा लाडका पोरगा दुःख भोगीत आहे या कल्पनेनें मरायाचें हृदय बधिर होऊन जाई. तिला कांहीं सुचत नसे. जोसेफ या सर्व गोष्टी ओळखून होता. तो म्हणे, "मला दिसून आलें की, मी या जगांत अगदी एकटा आहें. फक्त माझ्या आईचा जीव मात्र माझ्यासाठीं तळमळत असेल, आणि तीहि लांब इटलींत माझ्यासाठीं दुःखानें होरपळून गेली असेल. या कल्पना मनांत येतांच मला सर्वत्र भयाण शून्यता दिसूं लागते."

सन १८३७ नंतर त्याची इंग्लंडमध्यें हकालपट्टी करण्यांत आली. तेथें त्याचे दिवस थोड्या बऱ्या अवस्थेंत गेले. तरी दारिद्र्यानें त्याचा पाठपुरावा चालविलाच होता. मराया जिनोआहून त्याला अजूनहि मदत करीत होती. भारी किंमतीचे कपडे पाठविले तर चिरंजीव ते विकून आलेले पैसे सर्वांना वांटून टाकतील म्हणून ती माउली स्वस्त दराचे कपडे पाठवी. कोणतीहि मदत करावयाची नाहीं असा जोसेफच्या वडलाचा बाणा होता. पण मातृहृदयास कोठून राहवणार? मुलाच्या कार्याची महती तिला पूर्णपणें माहीत होती. घरांत काटकसर करून तिनें पैसे पाठविण्याचें काम पूर्वीप्रमाणेंच चालू ठेविलें होतें.

परंतु जोसेफच्या दुर्दैवानें कळस गांठला. आईनें दिलेली अंगठी त्याच्याजवळ होती. एके दिवशी तीहि त्याला विकावी लागली. आणि एका रविवारीं भूक शमविण्यासाठी त्याला अंगावरला कोट व बुटांचा जोड विकावा लागला! येवढी हालाखीची परिस्थिति आली तरी बहाद्दराचा धीर खचला नाही. या संकटकाळी त्याला त्याच्या मातृदेवतेचें स्मरण धीर देत असे. तिची आठवण होऊन तो म्हणतो, "अशी माझी इच्छा आहे कीं मातांनी आपल्या बालकांना काटकपणा येईल व आयुष्यांतील सर्व संकटांना पाठ देण्याची हिंमत येईल अशा प्रकारचें शिक्षण द्यावें. मुलांना चैनींत

या विलासांत वाढविण्यापेक्षां आया जर त्याना लहानपणापासून काटक बनवतील तर त्या मुलाचें खरें कल्याण केल्यासारखें होईल.... माझी आई —जिचें नामोच्चारण सदोदित धन्य असो !—भावी कालाची सूक्ष्म दृष्टीनें परीक्षा करून मला शिक्षण देती झाली की ज्या योगें दुर्धर प्रसंगांतहि अढळ रहाण्याचें धैर्य माझ्या अंगी आलें. आपल्या मुलाला भविष्यकाळीं सुख होईल असें शिक्षण देणारी जी प्रीति तीच खरी व दूरदर्शी प्रीति होय."

इकडे जिनोआ शहरी मरायाला सारखा ध्यास जोसेफचा लागलेला असे. ती धार्मिक वृत्तीची होती. अर्थात्च पुत्रासाठीं तिच्या प्रार्थना अखंड-पणें चालू होत्या. आपल्या पुत्रावर प्रेमाचा अखंड वर्षाव करून मराया त्याचें रक्षण करीत होतो. कार्लाईल आणि वर्ड्सवर्थ यासारखे मित्र मॅझिनीला मिळाले होते. कवि वर्ड्सवर्थ मरायाची एक आठवण आपल्या मित्रांना नेहमी सांगे. एन्रीको मेयर (Enrico mayer,) नांवाचा कविमित्र जिनोआ शहरी होता. मरायानें इंग्लडला यावें म्हणून वर्ड्सवर्थ-तर्फे त्यानें तिला विनति केली. परंतु त्यावेळी मराया दुखण्यानें जर्जर झाली होती. पुत्राची आठवण तीव्रतेनें होऊन तिला भडभडून आलें आणि क्षमा मागून ती म्हणाली, " मी येथें आजारी आहें अशी माहिती कृपा करून माझ्या मुलाला मात्र कळवूं नका. माझ्या लाडक्या 'पिप्पो' ला सांगा की तुझ्यासारखा मुलगा मला दिला म्हणून मी परमेश्वरास दररोज आळवीत असतें."

दरम्यान इटलीतील परिस्थिति पालटली होती. १८४८ च्या सुमारास राज्यक्रांतीचा दिवस येऊन ठेपला. सर्व जनतेनें स्वातंत्र्य-संग्राम झुजण्याचें ठरविलें. मॅझिनीचें स्वप्न साकार होऊं पहात होतें. फ्रान्सच्या मार्गानें त्यानें आपल्या मातृभूमीकडे धांव घेतली आणि एप्रिलच्या ७ तारखेस तो मिलन शहरी येऊन पोंहचला. आपल्या पुत्रास भेटण्याची कोण तळमळ मरायाला लागून राहिली होती. जोसेफसाठी अंतःकरणात उलघाल होत होती. जोसेफच्या वाटेकडे तिचे डोळे लागले होते. She with eyes of an aged Madona and the tongue of a Deborah was content to concentrate upon her role as mother of Giuseppe

Mazzini असें तिचें एकानें वर्णन केलें आहे. जोसेफला भेटण्यासाठी तिनें ताबडतोब मिलनकडे कूच केलें. कितीतरी दिवसांनी तिचा प्यारा 'पिप्पो' तिला भेटणार होता. भेट फार थोडा वेळ झाली. वृद्ध होत चाललेल्या मातुश्रीच्या दर्शनानें जोसेफनें स्फूर्ति घेतली आणि आपल्या अश्रूपूर्ण डोळ्यांनी मरायानें जोसेफला आशीर्वाद दिले. मायलेकरांच्या या भेटीचें फारसें वर्णन सांपडत नाही. बायबलाची एक प्रत म्हाताऱ्या आईनें जोसेफला भेट दिली.

मायलेकरांची ही शेवटची भेट होती. जोसेफ आपल्या उद्योगाला लागला. आणि मराया त्याच्यासाठी परमेश्वराच्या चिंतनांत काळ कंठू लागली. थोड्याच दिवसांपूर्वी डॉ. गायकोमो यांचें निधन झालें होतें, मुली आपापल्या घरी सुखांत राहिल्या होत्या आणि मराया एकटीच 'पिप्पो' च्या चिंतनांत दिवस काढीत होती. तिचा पति डॉ. गायकोमो जोसेफच्या जीवनाशी केव्हाहि समरस झालेला नव्हता. मुलाचे हे चाळे त्याला पसत नव्हते. परंतु मरायाची दृष्टि अधिक विशाल होती. स्वतंत्र इटलीचें स्वप्न पाहणाऱ्या जोसेफची ती आई होती. मुलाचे मनोरथ सफल केव्हां होतील याचा ध्यास तिला लागला होता. ती त्याची स्फूर्तिदायी देवता होती. त्याच्या प्रत्येक हलचालीकडे ती या वयांत सुद्धां लक्ष देई. प्रत्यक्ष मदत करणें तिला शक्य नव्हते. मॅझिनीची देशाच्या स्वातंत्र्याची धडपड अखडपणें चालू होती. दर वेळेस काही फितुरी होई, विश्वासघात होई, आणि मॅझिनीला हद्दपार व्हावें लागे. अज्ञातवासातच त्याचें जीवित जाणार की काय हें कोणासहि समजण्यासारखें नव्हतें.

शेवटची मरायाची वर्षे अत्यत काळजीत आणि निराशेंत गेलीं. जोसेफची व तिची भेट होणें अशक्य झालें. पुनः मॅझिनीला हद्दपारीचें आयुष्य प्राप्त झालें. दोघा मायलेकरांसबधी अनेक पत्रें उपलब्ध आहेत. एमिल हॉक्स (Emilie Hawkes) तिला लिहितो, "तुमचा पिपो गंभीर वृत्तीत आहे; पूर्वीप्रमाणेंच त्याची वागणूकहि कडक आहे. तो आपल्या कामांत गर्क असतो....त्याच्या शेजारी उमलेल्या फुलांचा गुच्छ नेहमीं असतो...." जोसेफलासुद्धां आपल्या आईसंबंधी अशीच पत्रद्वारा हकीगत

कळत असे. " सर्व केस पांढरे होऊन गेले आहेत. सुरकुतलेल्या चेहऱ्यावरून अश्रुधारा चाललेल्या आहेत." अशा अर्थाची माहिती जोसेफला सुद्धां समजत असे.

जोसेफकडून आलेलें पत्र मराया नेहमी आपल्याजवळ ठेवी. एके दिवशी आपली मैत्रीण इसाबेला झरबिनी हिच्याबरोबर ती घरीं येत असताना थकलेल्या देहांतून कसल्या तरी वेदना निघाल्या. रस्त्यांतच मराया थबकली. आपल्या छातीशी जपून ठेवलेलें पिप्पोचें पत्र तिनें काढलें; आणि आधाशीपणानें तें वाचण्यास तिने आरंभ केला. एकदम ती ओरडली, " माझ्या बाळा, बाळ जोसेफ " आणि आपल्या मैत्रिणीच्या अंगावर ती बेशुद्ध होऊन पडली.

त्याच अवस्थेंत तिला घरी आणण्यात आले. आईला शेवटचें कांही सांगावयाचें होते की काय याची चिंता मुलींना लागून राहिली. जोसेफचे मित्र तिच्या भोंवती गोळा झाले. प्रार्थना म्हणण्यात आल्या. मराया मॅझिनीची जीवितज्योत विझून गेली ! सर्व तऱ्हेचा वैरभाव विसरून मोठमोठे लोक तिच्या स्मशानयात्रेस हजर राहिले. पंधरा हजारावर लोक तिच्या स्वागतास सिद्ध होते. मोठ्या समारंभानें तिची मिरवणूक चालली होती; आणि जो तो या थोर मातेचें दर्शन घेऊन धन्य होत होता. समुद्रावर इंग्लिश, अमेरिकन, डॅनिश, डच, स्वीडिश लोकांनी आपल्या जहाजावरील निशाणें अर्धवट खाली करून मराया मातेस मानवंदना दिली. आणि रात्रीच्या वेळी प्रत्येक घरांतील खिडकीतून मेणबत्त्या जळत होत्या. मराया मॅझिनीच्या अंत्यस्थानापर्यंतचा रस्ता त्यामुळें उजळून निघत होता !

लंडन शहरांत मॅझिनीला हें वर्तमान समजले. त्यानें उद्‌गार काढले, " आता मला अगदी एकान्त द्या. मी शांत आणि खंबीर आहें. पण मला असा भास होत आहे की माझी अति महत्त्वाची व जगण्यास आवश्यक अशी वस्तू निघून गेली आहे. कोठे तरी अंधारांत मी ती शोधून काढीन."

परंतु जोसेफला ती वस्तू सापडणें शक्य नव्हतें !

पुढें मॅझिनीनें जन्मभर इटलीच्या स्वातंत्र्यासाठी धडपड केली. अनेक वेळां त्याच्या प्रयत्नास अपयश आलें. त्याचें सर्व आयुष्य बहुतकरून तुरुंगांत

किंवा हद्दपारीत गेलें. इटलीविषयी आणि रोमविषयी त्याच्या अंतःकरणांत विलक्षण प्रीति होती.

१८७० च्या सुमारास इंग्लंडमधून सिसिलीच्या बंडवाल्यांना मदत करण्यासाठी मॅझिनी निघाला असताना विश्वासघातानें त्याला पकडण्यात आले. गाइटाच्या किल्ल्यांतील अटकेत तो होता. काही काळानंतर त्याची सुटका झाली. रोममध्यें तो एकच रात्र राहिला. लहानपणी या रोमविषयीं त्याला फार अभिमान वाटे. रोमचें हे शेवटचें दर्शन म्हणून त्याच्याहि चित्तात कालवाकालव झाली. तो शांत परंतु उदास दिसत होता. जिनोआ येथें तो काही दिवस राहिला. मित्राच्या घरी त्याचे वास्तव्य होतें. रात्रीच्या समयी तो एकटाच स्मशानभूमीकडे गेला. आईच्या थडग्यापाशी येऊन नम्रपणें उभे राहतांच त्याला सबंध विश्व आठवलें. ' आई ' म्हणून सद्‌गदित चित्तानें त्याने मातेचें शेवटचे दर्शन घेतलें आणि दुसऱ्या दिवशीं तो इंग्लंडकडे निघून गेला.

उरलेलें त्याचें आयुष्य लंडन व ल्युगातो येथे गेलें. १८७२ मध्यें स्वदेशांत येत असतां वाटेंतच दि. १० मार्च १८७२ रोजी पिसा येथें प्ल्युरसीच्या रोगानें त्याचा अंत झाला. ऐंशी हजार लोक त्याच्या स्मशान-यात्रेस जमले होते. " मृत्यूनंतर जिनोआ येथे आईच्या थडग्याजवळच मला पुरावें " अशी मरणापूर्वीची त्याची इच्छा होती. त्याप्रमाणे त्याच्या मित्रांनी त्याचा दफनविधि जिनोआ शहरींच केला ! जोसेफ अखंडपणें सदैव आपल्या आईच्याच सन्निध राहिला !

असें या मायलेकरांचें अद्‌भुत चरित्र आहे. मराया ही एक श्रेष्ठ दर्जाची माता होती. तिच्या बुद्धिकौशल्यावर व नैतिक सामर्थ्यावर जोसेफ मानवजातीचा आदर्श पुढारी बनला. मरायाच्या मनाची धारणा प्रथमपासूनच तशी होती. जगाचा इतिहास घडविणारे आणि मानवांची कर्तव्यें समजावून सांगणारे श्रेष्ठ पुरुष यांच्यामुळेंच जगाचा विकास होत असतो अशी तिची श्रद्धा होती. आपल्या पोटांत वाढणारा आणि आपलें स्तनपान करणारा जोसेफ हाहि असाच एक युगपुरुष आहे हें तिनें पहिल्यापासूनच ओळखलें होतें. तिनें जोसेफला दैवी शक्तीचाहि पुरवठा केलेला होता.

नवऱ्याच्या राजकारणांत तिचें मन कधीच रमलें नाहीं. लहानपणी पंगु असणाऱ्या जोसेफला वाढविणे, त्याची जोपासना योग्य मार्गानें करणें, त्याच्या मनावर उत्तमोत्तम सस्कार करणें यांतच तिनें आपली इतिकर्तव्यता मानून घेतली. भोंवतालच्या इटलीतील राजकारणाचा, स्वार्थी वृत्तीचा आणि ढोंगी प्रवृत्तीचा तिला फार तिटकारा होता. जीवितांत तिनें आपलें प्रेम फक्त एकाच व्यक्तीस अर्पिलें. ती व्यक्ति म्हणजे जोसेफ. तो तिच्या मनोमंदिरांतील एकमेव परमेश्वर होता.

देशभक्तीची सर्व स्फूर्ति मॅझिनीनें आपल्या मातेपासून घेतली होती. आईच्या मृत्यूनतर एके ठिकाणी त्याने जे म्हटलें आहे त्यांतून मरायाच्या जीवनाचें सार प्रकट झाले आहे. तो म्हणतो,

"माझी माता इहलोकांत होती तेव्हा ती कितीतरी दूर आहे असें मला वाटत होतें. आतां ती देवलोकीं गेलेली आहे तरी तिचा आत्मा माझ्याच भोंवतीं कुठेतरी आहे असे मला वाटू लागतें. मानवी कर्तव्यांवर तिची फार निष्ठा होती. माझ्या अगीकृत कार्यावर तिची श्रद्धा होती. मातेच्या मृत्यूमुळे या कर्तव्याचे पावित्र्य अधिकच वृद्धिगत झालें आहे असे मला वाटूं लागले.—आता माझी मातृभूमि हीच माझी आई! माझ्या आईनें मला शेवटपर्यंत सोडलें नाही. त्याचप्रमाणें मीहि माझ्या मायदेशासाठीं यावज्जन्म कार्य करीत राहीन."

मरायाच्या चिंतनांत मॅझिनी एवढा गुग होऊन जात असे की प्रत्यक्ष आईच समोर उभी असा भास त्याला कितीदां तरी होत असे!

# टॉल्स्टॉय, काउंट लिओ

( १८२८–१९१० )

रशियांतील सुप्रसिद्ध कादंबरीकार, धर्मोपदेशक आणि समाजसुधारक म्हणून यांची प्रसिद्धी आहे. पौर्वात्य भाषा व कायदा यांच्या अभ्यासानंतर यांनीं १८५१ मध्यें क्रीमियन वॉरमध्यें सेबॅस्टोपोलच्या रक्षणांत जातीनें भाग घेतला. नंतर बराच प्रवास केल्यावर हे आपल्या जमीनजुमल्याच्या गांवीं जाऊन राहिले. अगदीं साधेपणानें जीवन जगून शेतकऱ्यांच्या सुखदुःखांशीं समरस होण्याचा प्रयत्न यांनीं चालू केला. War and Peace आणि Anna Karenina या त्यांच्या कादंबऱ्या जगप्रसिद्ध आहेत. आधुनिक शास्त्रें, तत्त्वज्ञान आणि धर्म यांसंबंधीं त्यांनीं आपलीं मतें या कलात्मक कादंबऱ्यातून मांडलीं आहेत. ‘अपकाराचा प्रतिकार करूं नका. देशांत दैन्य, कोर्टें, पोलीस वगैरे असण्याचें कारण नाहीं. अनत्याचार, अहिंसा आणि विश्वप्रेम यांवर आपल्या सर्व सुधारणा झाल्या पाहिजेत.’ अशी त्यांची विचारसरणी होती. टॉल्स्टॉय प्रभावी धर्मोपदेशक व संत म्हणून प्रसिद्ध आहेत.

## ११ : : मेरी व्हॅलकनस्काया टॉल्स्टॉय

( —१८३१ )

" माझी आई हंसूं लागली म्हणजे तिच्या चेहऱ्यावर एक प्रकारचें लावण्य चमकत असे. त्या हास्यामुळें भोवतालचें जग उजळून जाई व ती अधिकच मनोहर दिसे. माझ्या आयुष्यांतील दुःखाच्या क्षणी आईचें हास्य नजरेसमोर आलें की दुःख कोठच्या कोठे नाहीसें होतें."

रशियाचे प्रसिद्ध शांततावादी कादबरीकार कौंट लिओ टॉल्स्टॉय यांनीं आपल्या आईविषयीं हे उद्‌गार काढले आहेत. मेरी टॉल्स्टॉय ही रशियांतील नांवाजलेल्या व्हॉलकॅन्सी घराण्यातील होती. या घराण्याचा रशियन राजदरबाराशी सबध असून ते चागलें सपन्न होतें. निकोलस टॉल्स्टॉय, लिओचे वडील, पालियाना या गावी रहात असत. पालियाना या शब्दाचा अर्थ प्रकाशमय दरी असा आहे. हें खेडें निसर्गरम्य असून त्याच्या शेजारून एक नदी वहाते. नदीच्या कांठावर सुदर बागबगीचेहि असत. निकोलस हा सुद्धा मोठा लौकिकवान पुरुष होता. जग जिकण्यासाठीं निघालेला नेपोलियन ज्या वेळी रशियावर स्वारी करण्यास आला त्या वेळीं निकोलस टॉल्स्टॉयनें शौर्याची शर्थ करून दाखविली होती.

मेरी टॉल्स्टॉयने लहानग्या लिओवर जे सस्कार केले होते त्यामुळें पुढें टॉल्स्टॉयच्या सात्त्विकतेला बहर आला. तसें पाहिलें तर लिओला आपल्या मातेचा सहवास दोन तीन वर्षेंच मिळाला होता. सन १८२८ च्या १८ ऑगस्टला लिओचा जन्म झाला. मेरीचा हा सर्वांत लहान मुलगा. सर्जी, डिमिट्री आणि निकोलस या थोरल्या भावांच्या सांगण्यावरून लिओनें आपल्या श्रेष्ठ मातेचे मोठें हृद्य चित्र रगविलें आहे. कारण लिओ तीन वर्षांचा होण्यापूर्वीच मेरीचा अत झाला. लिओ आपल्या आईसंबंधीं लिहितो, " माझ्या आईची मात्र मला कोणतीच आठवण नाही. मी तीन वर्षांच्या वयाचा असतांना ती मरण पावली. आणि विलक्षण गोष्ट अशी कीं तिची एकसुद्धां तसबीर आमच्या घरी नाही. त्यामुळें ती कशी होती हें सुद्धां मला आठवत नाही," आणि लिओ टॉल्स्टॉयनें यांतच समाधान मानलें

आहे. याचें कारण तो सांगतो की, "माझ्या आईविषयी जी माझी कल्पना आहे ती शुद्ध आध्यात्मिक स्वरूपाची आहे. ती सुस्वभावी होती एवढीच काय ती तिच्याविषयी मला माहिती आहे. माझी ही कल्पना मला ती कुणी चांगली होती म्हणून सांगितल्यानें झाली नाही; तर तिच्यामध्यें जे चांगले गुण होते, त्यांवरून ती झालेली आहे."

आणि खरेंच, मेरी टॉल्स्टॉय सद्गुणी स्त्री होती. दिसायला सुदर नसली तरी मेरी त्या काळच्या मानानें फार सुशिक्षित होती. रशियन भाषा तिला चांगलीच येत होती. शिवाय फ्रेंच, जर्मन, इंग्लिश, इटालियन याहि भाषा मेरीला चांगल्या समजत असत. ललितकलांची तिला आवड असून ती पियानो उत्तम वाजवीत असे. मेरी टॉल्स्टॉय मोठी कल्पक होती. आपल्या मुलांना ती स्वतः गोष्टी रचून सांगे; आणि त्या कथातून मुलें रगून जात. आईच्या कथा ऐकण्याचें भाग्य जरी लिओला मिळाले नाही; तरी आईचा हा वारसा त्यानें फार मोठ्या प्रमाणावर उचलला होता. पुढें दीन-दुबळ्यांचीं दुःखें रंगविणारा लिओ टॉल्स्टॉय म्हणून त्याची जगभर कीर्ति पसरली. त्याचें श्रेय मेरीच्या या कथनकौशल्याला व कल्पकतेलाच देणें योग्य आहे. कल्पक माता आपल्या मुलांवर आपला ठसा उठविल्याखेरीज कशा राहतील?

प्रसिद्ध जर्मन कवि गटे, याची आई एलिझाबेथ गटे हिनें आपल्या मुलाच्या अंगी असणाऱ्या कवित्वाचा व तरल भावनांचा विकास गोष्टी सांगूनच केला होता. एलिझाबेथची भेट घेतल्यानतर एकाने उद्गार काढले, "Now do I understand how Goethe has become the man he is!" (आतां मला समजलें, गटे एवढा थोर माणूस कां झाला तो!) गंमतीची गोष्ट पहा कशी ती ! मेरी टॉल्स्टॉयनें आपल्या थोरल्या मुलांना कथा सांगितल्या; वर्षादीड वर्षाच्या लिओला त्या समजल्याहि नसतील; पण आईचें हें देणें मात्र त्यानेंच सर्व उचललें. लिओनें सांगितलें आहे, "माझ्या आईच्या गोष्टी इतक्या उत्तम असत की त्या तिनें रचलेल्या आहेत असें सांगितलें तरी लोकांना खरें वाटत नसे."

मेरी टॉल्स्टॉयचा आणखी एक गुण लिओंत उतरला होता. जगांतील युद्धें नाहींशी व्हावींत, सर्वत्र बधुभाव वाढावा, निसर्गाच्या सान्निध्यांत

मानवी हृदयांतील सर्व दुष्टता, कटुता नष्ट व्हावी आणि सर्व जगांत शांतता नांदावी असा संदेश लिओनें आपल्या अमर अशा कथा वाङमयांतून जगाला दिला. दुःखीकष्टी, गरीब शेतकरी मजूर याच्या वेदना लिओनें सहृदयतेनें जाणून घेतल्या. बहुजन समाजासाठी त्यानें आपलें सरस साहित्य निर्माण केलें. लिओच्या मनाचा हा कनवाळुपणा त्याच्या आईकडूनच आलेला होता. मेरी सुस्वभावी व सद्‌गुणी होती. कोणालाहि अपशब्द ती कधी बोलली नाही. लिओ यासबधी लिहितो, "माझ्या आईच्या दासी सांगतात की, त्यांच्या हातून एखादी चूक घडली तर आई रागानें तांबडी लाल होई आणि मग तीच रडू लागे. पण त्याना कधीच टाकून बोलत नसे. तिला 'शिवी' म्हणजे काय हें माहीत नव्हतें."

मेरीनें आपल्या पतीला काही पत्रें लिहिली आहेत. त्याचप्रमाणें मुलगा निकोलसच्या सबधी तिनें एक रोजनिशी लिहिली होती. या तिच्या लिखाणावरून तिच्या अगी असणाऱ्या विनयाची आणि सहनशीलतेची साक्ष पटते. मेरी टॉल्स्टॉयची पत्रें अत्यत साधी आणि प्राजल अशी आहेत. कृत्रिमतेचा डौल आणि दिमाख त्यात बिलकूल दिसत नाही. पत्रें लिहितांना शब्दांचा फुलोरा माजवून भावनाचें रुक्ष प्रदर्शन कित्येक लोक करतात. मेरीला अर्थात्‌च हें पसत नव्हतें. लिओच्या वडिलांची पत्रें अशा प्रकारच्या पोकळ प्रौढीनें भरलेली असत. आपली आई आणि आपले वडील यांच्यांतील या बाबतीतील फरक लिओनें उदाहरणे देऊन स्पष्ट केला आहे. त्याचे वडील लिहीत, "माझ्या अतिगोड मित्रा, तुझ्या सहवाससुखाशिवाय मला दुसरें काहीं सुचत नाही." आणि हाच मजकूर मेरी अशा प्रकारें लिही, "प्रिय मित्र, तू येथें नसतांना, तुझ्या सहवासाचा जरी आम्हांस फारसा लाभ झाला नसला तरी तुझ्या अनुपस्थितीमुळें वेळ फारच कटाळवाणा भासूं लागला आहे."

मेरीचें लिओवर फार प्रेम होतें व ती त्याला 'माझा छकुला बेंजामिन' म्हणून संबोधीत असे. लिओचा थोरला भाऊ निकोलसहि तिचा फार लाडका होता. या निकोलसचें शिक्षण कसें व्हावें, त्याच्या मनाचा विकास कसा व्हावा, इत्यादि सूचना मेरीनें त्याच्या बालपणी लिहिलेल्या रोजनिशीत

केल्या आहेत. निकोलसचा फार हळवा स्वभाव तिला पसत नव्हता. जनावराचा छळ झालेला पाहून तो रडत असे; हें पाहून त्यानें अधिक खंबीर मनाचें व्हावे असे मेरीला वाटे. लिओ सर्वात लहान म्हणून तो अर्थात्च तिला फारच आवडत असे. या धाकट्या मुलाचा सर्वांगीण विकास करणें तिच्याकडून झालें नाही. ऐन वयांत असतांनाच तिचा अत झाला. लिओ आपल्या आईसबधी लिहितो;

" माझ्या आईचें वैवाहिक जीवन फार तर नऊ वर्षांचें होतें. पण तें अतिशय सुखांत आणि आनदांत गेलें. आमच्या कुटुबांतील सर्व माणसांचें तिच्यावर प्रेम होतें आणि तिचेहि त्यांच्यावर होते. तिच्या पत्रांवरून मला असें वाटतें की तिला एकातवास प्रिय होता....माझ्या आईचे जीवन बहुतेककरून मुलाच्या सगोपनात, घरकामांत, सहलीत आणि वाचनात गेले. तिला कादबरी वाङमयाचा मोठाच नाद होता. सायकाळच्या वेळी ती आजीला रूसोच्या ' एमिल ' सारख्या कादबऱ्या वाचून दाखवी. ती जे जें वाचीत असे त्यांवर दुसऱ्यांशी चर्चा करी. फुरसतीचा वेळ पियानो वाजविण्यांत किंवा माझ्या चुलतींना इटालियन शिकविण्यांत ती खर्च करी."

घरांतील वडील माणसें, बधु, आणि नोकरचाकर यांच्या सांगण्यावरून आणि मेरीच्या पत्रांवरून लिओनें आपल्या 'Childhood, Boyhood and Youth' या विख्यात आत्मकथेत आईचे चित्र अत्यत हृदयगम पद्धतीनें चितारलेलें आहे. अर्थात् त्यांत कल्पनेचा भाग असला तरी लिओ आणि मेरी यांचें ओझरतें कां होईना पण रमणीय दर्शन त्यांतून होणारें असल्यानें एक दोन प्रसग देण्यासारखे आहेत.

" माझ्या आईची मूर्ति आठविण्याचा मी जेव्हां प्रयत्न करतों तेव्हां पहिल्यानें दया आणि प्रेम याचा वर्षाव करणारे तिचे काळेभोर डोळे मला दिसू लागतात. तिच्या मानेवर एक बारीकशी चामखीळ होती. तिच्या गळ्याभोंवती घरीच विणलेली पांढरी स्वच्छ कॉलर असे. तिचे हात अत्यंत नाजुक आणि मऊमऊ असत. किती तरी वेळां तिनें मला या हातांनीं कुरवाळलें असेल...तरी पण तिचा संपूर्ण चेहरा मला आठवणें शक्य नाही....माझ्या आईचें हास्य अत्यंत मधुर असे....मला आठवतें

एके दिवशी आईनें माझें मस्तक आपल्या दोनहि नाजुकशा हातांनीं धरलें, आणि तें किंचित् मागें वाकवून माझ्याकडे ममतापूर्ण दृष्टीनें पहात ती म्हणाली,

" आज सकाळी रडत होतास तू ? "

मीं उत्तर दिले नाही. तिने झटकन् माझ्या डोळ्याचा पापा घेतला आणि पुनः जर्मन भाषेत मला विचारले; "कां ? रडायला काय झाल होतं ?"

आईला जर्मन भाषा उत्तम येत असे. आमच्याशी विशेष ममतेनें बोलतांना ती जर्मन भाषा वापरी.

" आई मला भयकर स्वप्न पडत होते.... " मी उत्तर देत असतांनाच मला भयाण स्वप्नाची स्मृति झाली. माझा थरकाप उडालेला पाहून आईनें मला आपल्या छातीशी घट्ट धरून ठेविले."

मेरीची प्रकृति कधी कधी बरी नसे. कधी त्याबद्दल ती खिन्न होऊन जाई. अशाच एका प्रसगाचें चित्रण टॉल्स्टॉयनें केले आहे.

"–एके दिवशी सकाळी अथरुणांतून उठून मी आराम खुर्चीतच पेंगूं लागलो. आई बोलली, ' पुनः झोपलास वाटते तिथ ? ' मी उत्तर दिलें " छे ग आई, मी झोपत नाही. नुसता पडलोय " आणि मी झोपून गेलों. थोड्या वेळांत मला समजलें, की आई मला जागे करीत आहे. खुर्चीच्या हातावर बसून एका हातानें माझे केस हळुवारपणाने कुरवाळीत ती म्हणाली,

" राजा, ऊठ ना. उशीर झाला."

तिनें आपला दुसरा हात माझ्या गळ्याभोवती घातला; आणि ती मला गुदगुल्या करू लागली, तसा मी जागा झालो. मी माझे चिमकुले हात तिच्या मानेभोवती टाकून म्हटले,

" आई, तू किती छान आहेस ! "

यावर ती हसली, परतु त्यांत खेदाची छटा होती. तिनें मला दोनहि हातांनी कुरवाळलें, माझ्या कपाळाचा पापा घेतला आणि आपल्या मांडीवर घेऊन ती आतुरतेने बोलली, " खरंच, मी तुला फार आवडतें नाही ? " थोडा वेळ थाबून ती पुनः म्हणाली, " राजा, तूं नेहमी मला आठवींतच रहा. कधी बिसरूं नकोस. तुझी आई जरी निघून गेली तरी...तूं तिला

विसरूं नकोस....'' पुनः तिनें मला जवळ घेतलें. ती फार कष्टी दिसत होती. मी बोललों;

"आई, पुनः असलं बोलू नकोस....माझी आई ती." म्हणत मी तिच्या मांडीवरच माझें अंग घुसळलें. सुखदुःखाचे अश्रु माझ्या डोळ्यांत तरारले होते.''

आईच्या अंतकाळची हकीगतहि अत्यत हृदयस्पर्शी भाषेंत लिओनें सांगितली आहे. लिओ आपल्या वडिलाबरोबर परगांवाहून घरी परत आला तेव्हां त्याच्या वडिलांनी पहिल्यानें लिओच्या आईच्या प्रकृतीची चौकशी केली. तेव्हां समजलें की सहा दिवसांत तिने अथरूणहि सोडलें नव्हतें. सर्व घर चिंताग्रस्त होऊं गेलें. लिओनें वर्णन केले आहे;

"आई बेशुद्ध आहे असें आम्हास सांगण्यांत आलें. मी निरखूं लागलों. आईचे डोळे पूर्णपणें उघडे होते, परतु ते आम्हास ओळखूं शकत नव्हते. त्यांतील भीतिदायकता मी केव्हांहि विसरणार नाही. त्या प्रसगीं मला फार वेळ तेथें राहू दिलें नाही. परतु आईच्या अखेरच्या अवस्थे-संबंधीची हकीगत मला नॅटेलियानें सांगितली ती अशी—आई मृत्यूशीं बराच वेळपर्यंत झगडत होती. शेवटी तिनें आपलें डोकें उशीवर टेकविलें. स्वर्गीय देवतेप्रमाणें तिला शांत झोंप लागल्यासारखें झालें. मी औषधाची कांहीं व्यवस्था पाहण्यासाठी म्हणत खोलीबाहेर आलें. परत येऊन पाहतें तों आई अंथरुणातील कपडे दूर फेकीत बाबाना हांक मारीत होती. बाबा जवळ येऊन उभे राहिले. तिला काही बोलावयाचें होतें, पण तिच्यांत बोलण्याची शक्ति उरली नव्हती. ती आपले ओठ फक्त कसेबसे उघडूं शकली आणि पुटपुटली, "दयाघना, परमेश्वरा, मुलांचें रक्षण कर... आणि लागलीच तिनें आपले हात लांबविले,...मुलांना घ्यावयाचें होतें वाटतें...परत हात खाली आगले...पुनः तिनें अंग सावरण्याचा प्रयत्न केला, आणि पुटपुटली, परमेश्वरा, माझ्या मुलांना कांही कमी पडूं देऊं नकोस.'' नंतर तिच्या चेहऱ्यावरची अवकळा वाढली, तिच्या निर्विकार डोळ्यांवरून तिला होणाऱ्या असह्य वेदना स्पष्ट होत होत्या. प्राण कोठेंतरी घुटमळत होता. शेवटी ती मागें उशीवर पडली; आणि रडूं लागली...रडूं

लागली...'' सांगतां सांगतां नॅटेलियाच सद्‌गदित होऊन थांबली. दुःखद यातना भोगून माझी आई निघून गेली होती.''

आईच्या सहवासाचें सुख लिओ टॉल्स्टॉय यांना जरी फारसें लाभलें नाही तरी आईचे अनेक गुण त्यांच्यांत उतरले होते. आपल्या भावंडांच्या आणि आप्तांच्या सांगण्यावरून त्यांनी आपल्या आईची आठवण सदैव ताजीतवानी ठेवली होती. तिच्या पत्रांवरूनहि त्यानी आपल्या आईच्या स्वभावाची रेखा पक्की केली होती. लिओ टॉल्स्टॉय एके ठिकाणी लिहितात, '' माझ्या अतःचक्षूसमोर तिची उदात्त, पवित्र आणि अलौकिक मूर्ति उभी राही, तेव्हां जीवनात मी माझ्या मनोविकाराशी आणि मोहाशी झगडतांना माझा विजय व्हवा म्हणून मी तिच्या आत्म्याची करुणा भाके. आणि समाधानाची गोष्ट अशी की, त्या प्रार्थनेचा मला फायदा होई. ''

'माय मरो आणि मावशी जगो' अशी आपल्याकडे एक म्हण आहे. मावशी म्हणजे 'मायशी;' आईसारखीच असते. मेरी टॉल्स्टॉयनतर लिओच्या मनावर ज्या एका व्यक्तीचा फार परिणाम झाला, ती म्हणजे त्याची दूरची मावशी टॅशियाना ही होय. तिची शिकवण पुढें लिओला फारच उपयोगी पडली. ही मावशी मोठी प्रेमळ होती. तिचा परमेश्वरावर फारच विश्वास होता. परोपकाराची वृत्ति, दृढ निश्चयी स्वभाव, आणि स्वार्थत्यागाचें जीवन ही टॅशियानाच्या स्वभावांत प्रमुख वैशिष्ट्यें होती. लिओवर तिनें निर्व्याज प्रेम केलें; आणि लिओनें तिच्याबद्दल नितान्त आदर ठेवला होता. या दोघांचा झालेला पत्रव्यवहार पाहिला म्हणजे टॅशियानाचा केवढा प्रभाव लिओवर पडलेला होता हें ध्यानात येते.

तिच्या ठिकाणीं दोन मोठे सद्‌गुण होते. प्रेम आणि गांभीर्यवृत्ति ! या गुणांचा मोठाच परिणाम लिओच्या जीवनावर झाला. येणाऱ्या-जाणाऱ्या साधुसंतांकडे तिचा विलक्षण ओढा होता, आणि वृत्तीनेंहि ती गूढवादी होती. टॅशियानेकडे जमलेले यात्रेकरू अनेक गोष्टी सांगत. लिओ त्या सर्व सावधानपणें ऐकी; आणि यांतूनच त्याला आध्यात्माची गोडी निर्माण झाली. रात्रदिवस गूढरम्य स्वप्नात रमून जाऊन त्याची जीवनदृष्टि गभीर झाली. वयाच्या पांचव्या वर्षी त्यानें जाणलें, '' जीवन करमणुकीसाठीं

नव्हे तर फार मोठ्या जबाबदारीसाठी मिळालेलें आहे." पुढें तो सनातन धर्मविरुद्ध गेला तरी ईश्वरावरील त्याची श्रद्धा दृढ होती. ऐन युद्धावर असतांना देखील ईश्वर आपणास वाचवीत आहे असा त्यास गूढ अनुभव येई. सन १८८५ च्या ५ मार्चच्या डायरीत तो लिहितो;

"एक महान् विचार माझ्या मनांत आलेला आहे. त्या विचाराच्या साक्षात्कारार्थ मी आपलें जीवन देईन असें मला वाटतें....कोणता हा विचार? कोणतें हें नवीन ध्येय?...नव्या धर्माचा पाया घालण्याचा विचार मला सुचला आहे...." सर्व मानवजातीस लिओ टॉल्स्टॉय यांनीं प्रेमाचा धर्म दिला आहे.

हा गूढवादी असणारा प्रेमाचा धर्म टॉल्स्टॉयनें टॅशियाना बाईकडून उचललेला दिसतो. या मावशीचें संबध नांव टॅशियाना ॲलेक्झांड्रोव्हना एर्गोल्स्की असें होतें. हिच्यासंबधी टॉल्स्टॉयनें लिहिलें आहेः—

"टॅशियानावर आम्हा मुलांचे अपरंपार प्रेम होतें. ती दृढ निश्चयी व सदा आनंदी होती." तिच्या निश्चयी स्वभावासंबंधीची गमतीदार हकीगत लिओनें दिली आहे. एकदां मुलेंमुलें "मुशियुश रकाव्होला" याच्या गोष्टी वाचीत होती. त्यांतील अद्‌भुत घटनांनी सर्वांना नवल वाटलें. या गोष्टी अशक्य आहेत असें जो तो म्हणू लागला. टॅशियाना चट्‌कन म्हणाली 'मुळीच नाही. अशा गोष्टी मीहि करून दाखवितें.' कोणालाच तिचें म्हणणें खरें वाटले नांही. शेवटी एकानें एक लोखंडी पट्टी लाल होईपर्यंत तापविली; आणि ती टॅशियानाच्या उघड्या हातावर ठेवली. अर्थात्‌च तिला वेदना होत होत्या, पण तिनें हू की चू केलें नाही, की हात मागें घेतला नाही. तापलेली पट्टी उचलण्यांत आली तेव्हां टॅशियानाच्या हाताचें जळकें कातडेहि पट्टीस चिकटून वर आलें! आणि या वेळी मात्र ती 'अग आई' म्हणून ओरडली! घरांतील माणसांनी तिला या जखमेसंबंधीं विचारलें तेव्हां ती बोलली, "मुशियुश रकाव्होलाप्रमाणें आपणास अनुभव घ्यावयाचा होता, म्हणून ही जखम करून घेतली." लिओनें या विलक्षण प्रसंगाचा उपयोग आपल्या 'युद्ध आणि शांति' या कादंबरीत 'सेनिया'

नांवाच्या पात्राच्या हातास जखमेचा वण दाखवून केला आहे. अशा प्रकारें टॅशिनिया खंबीर आणि निर्भय मनाची होती.

टॅशिनियाच्या स्वरूपाचेंहि वर्णन लिओनें दिलें आहे. तो लिहितो, "तिचा केशसंभार विपुल होता. लांब सडक काळ्याकुरळ्या केसांची ती वेणी घाली. तिचे डोळे काळेभोर होते. त्यांतून तिचा उत्साही आणि आनंदी स्वभाव व्यक्त होई....ती मला फार फार आवडे. तिचे काळेभोर डोळे, तिचें हास्य, तिचे गोडस लहान हात, आणि त्यावर उमटलेल्या निळ्या रंगाच्या रक्तवाहिन्या याकडे पाहावेसें वाटे !"

टॅशियाना चांगली शिकलेली होती. ती फ्रेंच भाषा उत्तम लिही आणि बोले. पियानोहि तिला उत्कृष्ट वाजवतां येई. परंतु काही कारणांवरून तिनें पियानो वाजविण्याचें सोडून दिलें होतें. तीस वर्षांत तिनें त्याला हात लावला नव्हता. परंतु लाडका लिओ जेव्हा पियानो शिकू लागला तेव्हां तिनें पुनः पियानोच्या वादनास प्रारंभ केला. ते दोघे एकत्र बसून पियानो वाजवीत असत. शास्त्रोक्त आणि सफाईदार वादनात ती तरबेज होती.

लिओनें अनेक गोष्टी या मावशीसंबंधानें सांगितल्या आहेत. तिच्या सान्निध्यांत लिओचा काळ मोठा सुखाचा गेला. तिला मिठाई, आलेपाक, अंजीर इत्यादि खाण्याच्या वस्तु काचेच्या बरण्यांतून मांडून ठेवण्याची भारी हौस होती. लिओसाठी त्या वस्तू असत. ती अनेक वेळा लिओकडे पैसे या कामासाठी मागे; आणि लिओनें नाही म्हटलें की ती मनस्वी खिन्न होई. एक सुस्कारा टाकून ती गप्प राही. यासंबंधी टॉलस्टॉयनें लिहिलें आहे; "ती आठवण होतांच माझ्या हृदयाला फार दुःख होतें. त्यावेळी माझी आर्थिक परिस्थिति फार बिकट होती. मी पैशाच्या अडचणींत नेहमीं असे. परंतु असें असतां, तिला पैसे देण्याचें नाकारल्याबद्दल मला दुःख होई."

टॅशिनिया नोकरवर्गाशीहि प्रेमानें वागे. त्यांना ती कधीच रागे भरली नाही. त्यांच्यावर ओरडणें किंवा हात टाकणें या गोष्टी तिच्या गांवींहि नव्हत्या. त्यामुळें प्रत्येकाचें तिच्यावर प्रेम होतें. ती जेव्हां मरण पावली तेव्हां गांवांतील प्रत्येक घरचा खेडूत तिच्या दफनविधीस हजर होता.

# थॉमस आल्व्हा एडिसन

( १८४७—१९३१ )

संशोधनसम्राट् म्हणून थॉमस एडिसन या अमेरिकन शास्त्रज्ञाचें नांव प्रसिद्ध आहे. लहानपणापासून निरनिराळे प्रयोग करण्याच्या हौसेंतून अनुभव घेतांघेतां, प्रयोग करता करतां याचें नांव जगप्रसिद्ध झालें. यांनीं प्रथम तारायंत्रांतील आपलें संशोधन पूर्ण केलें. सन १८७६ मध्यें मेन्लोपार्क येथें स्वतःची प्रयोगशाळा स्थापन झाल्यावर यांनीं बेलनें संशोधिलेल्या टेलिफोनमधील दोष घालवून टाकले. ध्वनीच्या बाबतींत तर यांचें संशोधन अमोल आहे. १८७७ मध्यें ‘ Mary had a little lamp ’ हें गाणें पहिल्यानें तबकडीवर वाजवून दाखवून यानीं ग्रामोफोनचा प्रयोग सिद्ध केला. बोलक्या चित्रपटाचें युगहि याच्याच प्रयत्नानें आणि शोधांमुळें सुरू झालें. १८७९ सालीं यानीं विजेचा पहिला दिवा तयार केला. यांच्याच प्रयत्नांमुळें आज घरोघरीं विजेचे दिवे दीपत्कार करून हजर आहेत. रोजच्या व्यवहारात लागणाऱ्या सर्व सुखसोयी एडिसनमुळें आज शक्य झाल्या आहेत. वीजगाडया, ट्रॅम्स, तारायंत्रें, टेलिफोन, विजेचे दिवे, बोलपट इत्यादि अनेक उपयुक्त सुधारणांबरोबर यांचें नांव निगडित झालेलें आहे. पराकाष्ठेचे श्रम, अचाट बुद्धिमत्ता, हे यांचे प्रमुख गुण होते. “ माझ्या यशांत एक भाग बुद्धिमत्तेचा व नव्याण्णव भाग दीर्घोद्योगाचे आहेत. ” असें एडिसनसाहेब नेहमीं म्हणत असत.

## १२ : : नॅन्सी ईलिएट
### ( १८४७--१८७१ )

नॅन्सी घरकामांत गुतली होती. तिचा लहानगा ' अल् ' शाळेंत गेला होता. त्याच्या वर्गाची आज इन्स्पेक्शन होती. नॅन्सी आपल्या या मुलाकडे फार लक्ष देई. तिचा हा दुसरा मुलगा शरीरानें फारच कोमल होता. लहानपणी त्याची प्रकृतीहि नाजुक होती. शरीराच्या मानानें डोक्याचा आकार जरा मोठा असल्यानें लहानग्या थॉमसला बुद्धिभ्रंश होतो की काय, त्याला मज्जातंतूचा विकार जडतो की काय याची काळजी सर्वांना वाटे. या विचित्र ' अल् ' बद्दल तर नॅन्सीला मोठीच चिंता वाटे. त्याच्या प्रत्येक हलचालीकडे ती लक्ष पुरवीत असे. थॉमसची शाळेंतहि फारशी प्रगति झाली नाही. त्याचा नंबर बहुधां नेहमी शेवटीच असावयाचा. थॉमसच्या बापाला मोठीच चिंता लागून राहिली होती की आतां या पोराचें होणार तरी काय ? परतु नॅन्सीला 'अल्, पुरता ठाऊक होता. त्याच्या बुद्धिमत्तेबद्दल तिला कधीहि शंका आली नाहीं. त्याच्या चौकस बुद्धीवरून तिनें त्याची चांगलीच परीक्षा केली होती. त्याच्या निरीक्षणशक्तीचेंहि तिला कौतुक वाटे. त्याच्या शरीराकडे मात्र लक्ष द्यावयास हवें होतें आणि त्याचाच विचार आज ती करीत होती. मध्येंच सहज तिचें लक्ष दाराकडे गेलें, तों शाळा सुटण्याच्या अगोदरच रडवा चेहरा करून तिचा लाडका 'अल्' घराच्या पायऱ्या चढत होता. नॅन्सीच्या चित्तांत एकदम गडबड झाली. काय झालें छोट्या ' अल् ' ला ? कोण बोललें त्याला ?

" आई ग ऽ " करीत छोटा थॉमस घरांत आला आणि आईच्या पुढ्यांत तोंड लपवून ढसाढसा रडू लागला.

" अरे अल्, काय झालें सांग ना ? कोण बोललें तुला ? "

" आई, वर्गांत परीक्षक आले. त्यांनी मला ' मठ्ठ डोक्याचा ' ठरविलं...हो आई ? माझं डोकं मठ्ठ आहे ? "

आईला परीक्षकांचा संताप आला.-या परीक्षकांना कांहीं कळतें का ?

मुलांच्या भावना तरी यांना समजतात का ? तिच्या मनांत अनेक विचारांचें काहूर निर्माण झालें. प्रथम थॉमसला समजावीत ती बोलली;

"अल्, उगी रहा. तूं फार हुशार आहेस. कोण म्हणत तुला मह ? थांब मी आतां त्या परीक्षकांनाच जाऊन विचारतें...तू गप्प रहा. आजपासून शाळेंतच जाऊ नकोस तू. मी तुला घरी सर्व कांही शिकवीन."

'अल्' ला केवढा धीर आला. आपली आई किती चांगली आहे याचा अनुभव यावेळीं प्रथम थॉमसला आला; आणि नॅन्सी खरोखरीच परीक्षकाची हजेरी घेण्यास शाळेंत गेली. सात्त्विक सतापानें ती फुलून गेली होती. लाडक्या लेकाला कोणी बोलले म्हणून भाबड्या आईच्या हृदयाचा संताप नव्हता तो. नॅन्सीला शिक्षणशास्त्राचें चांगलेच ज्ञान होतें. ती स्वतः शिक्षकाचा पेशा नीट समजून करीत असे. बालकाच्या मनोव्यापाराचें ज्ञान तिला उत्तम प्रकारें होतें; आणि सर्वत्र शिक्षण देणाऱ्या अर्धवट पतोजींच्या अज्ञानाचीहि तिला कीव येई. प्राथमिक शाळेंतील पतोजी म्हणजे एक प्रकारचा राक्षस आहे असें तिला वाटे. तो कसचें शिक्षण देणार ? आणि नॅन्सीचें म्हणणें अगदी खरें होतें. येवढ्या लहानग्या वयातच अमुक एक मुलगा मह डोक्याचा, म्हणून कुचकामाचा असे ठरवून कसें चालेल ? हंफ्रे डेव्ही, जेम्स वॅट, न्यूटन ही शास्त्रज्ञ माणसें तरी बालपणी कोठें चमकली होती ? थॉमस एडिसन यालाहि लहानपणी लोकानी मह डोक्याचा म्हणून ठरविले. परतु त्याची आई मोठी शहाणी, म्हणून तिनें आपल्या मुलास नीट वळण लावलें.

थॉमस एडिसन्चें घराणें मोठे लौकिकवान् होतें. इतर लोकांप्रमाणेंच हेंहि घराणें आठराव्या शतकाच्या प्रारभी युरोपांतील हॉलड देशातून येऊन अमेरिकेंत स्थायिक झाले होते. थॉमसचे वाडवडील चांगलेच दीर्घायुषी होऊन गेले. त्याचे पणजोबा थॉमस एडिसन हे १०४ व्या वर्षी निवर्तले. थॉमसचे आजोबा जॉन एडिसन हे १०२ वर्षांचे होऊन निधन पावले. थॉमसच्या वडिलांचे नांव सॅम्युअल, हाहि मोठा कर्तबगार माणूस होता. एकदां बडाच्या काळी यानें चार दिवसांत १६० मैलांचें अंतर तोडून आपला जीव बचावला. आहिओ संस्थानांत मिलन गांवीं त्याचा लाकडी

सामानांचा कारखाना होता. याच्या बायकोचें नांव नॅन्सी इलियट. जॉन इलियट नांवाच्या पाद्रयाची ही मुलगी मोठी बुद्धिमान होती. सन १८१० साली न्यूयॉर्कमध्यें तिचा जन्म झाला. तिचे वडील धर्मोपदेशक असल्यानें तिच्या मनावर प्रथमपासूनच चांगले सस्कार झाले होते. ईश्वरावर दृढ निष्ठा ठेवावी आणि आचरण अत्यंत शुद्ध राखावें ही शिकवण तिला तिच्या घरी आरभापासूनच मिळाली होती. चागल्या प्रकारची शिक्षकीण म्हणून तिचा लौकिक सर्वत्र पसरला होता. विद्या, सुस्वभाव, आणि सौंदर्य यांचा सुदर सगम नॅन्सीमध्यें झालेला असल्याकारणानें थॉमसमध्येंहि हेच गुण प्रगट झालेले दिसतात. व्हिएन्ना येथे शिक्षकिणीचें काम करीत असतां तिचें आणि सॅम्युअलचें प्रेम जमलें आणि सन १८२८ मध्यें त्या दोघांचा विवाह झाला.

आल्व्हा थॉमस हा याचा दुसरा मुलगा. पहिला विल्यम पिट या नांवाचा होता. ‘ आल्व्हा ’ हे नाव जरा लोकांना चमत्कारिक वाटलें. कारण एडिसनचें मूळ घराणें हॉलड देशातील, तेथील ‘ आल्व्हा ’ नांवाचा डयूक अत्यत जुलमी होता. तेव्हां लोकाना शका आली हें भयकर नांव नॅन्सीनें का निवडलें ? परतु यासबधी निराळा खुलासा करणें आवश्यक आहे. एरी सरोवरात जहाजाचा व्यापार करणारा आल्व्हा ब्रॅडले नांवाचा सॅम्युअलचा एक मित्र होता. त्याच्या अकाली निधनानें एडिसनच्या कुटुं-बाला फारच दुःख झालें होतें. या परम मित्राचें नाव अजरामर करण्यासाठी थॉमसचें नाव ‘ आल्व्हा ’ असें ठेवण्यांत आलें. ‘ आल्व्हा ’ च्या जोडीनें येणारें थॉमस हें नाव न्यूयॉर्कमधील एका पेढीच्या मालकाच्या नांवावरून घेण्यांत आलें होतें. असा या ‘ थॉमस आल्व्हा ’ या जोड नांवाचा इतिहास आहे. या ‘ आल्व्हा ’ स नॅन्सी गमतीनें ‘ अल् ’ म्हणून हांक मारीत असे. ‘ अल् ’ चा जन्म मिलन या गांवी ११ फेब्रुवारी १८४७ या दिवशी झाला.

थॉमसचें शिक्षण शाळेंत होणें अशक्य झाल्यावर नॅन्सीनें घरच्या घरीच त्याला शिकविण्यास आरभ केला. नॅन्सीला मुलांचा मोठाच शोक होता. स्वतः जातिवत शिक्षिका असल्यानें पोर्ट ह्यूरान येथील सर्व मुलांना ती नीट जपत असे. त्यांना ती नाना प्रकारच्या गोष्टी सांगून वारंवार खाऊ

वाटीत असे. थॉमसच्या पुस्तकांची निवड नॅन्सीनेंच केली. ‘ अल् ’ बरोबर ती स्वतः वाचावयास, लिहावयास बसे. थॉमसला शिकवी; त्याच्या अभ्यासाची चांचणी घेई. अवघड असलेला भाग ती स्वतः त्याला वाचून दाखवी. आईच्या प्रेमळ वागणुकीत ‘ अल् ’ लौकरच चांगला तयार झाला. गिबनचा ‘ रोमन साम्राज्याचा ऱ्हास व अंत ’; ह्यूमचा ‘ इंग्लंडचा इतिहास, ’ असे अवघड अवघड ग्रंथहि नॅन्सीनें थॉमससाठी वाचले; आणि नवलाची गोष्ट अशी कीं थॉमसलाहि त्यांत गोडी वाटली. सर्वांत आश्चर्याची गोष्ट म्हणजे नॅन्सीनें थॉमससाठी न्यूटनचा प्रिन्सिपिया हा गणितविषयक ग्रंथहि अभ्यासाठी निवडला ! अर्थात् या ठिकाणी दोघांचेंहि बुद्धिसामर्थ्य लंगडें पडलें. मोठमोठ्या गणित तज्ज्ञांनासुद्धां तो समजण्यास कठीण असा ग्रंथ आहे. मग नॅन्सी किंवा आल्व्हा यांची काय कथा ?

तरी पण थॉमसची फारच प्रगति झाली. त्याचा बाप सॅम्युअल विद्येच्या बाबतीत आपला असा तसाच होता. पण पोराचें ज्ञान पाहून तो चकित्‌च झाला. याच वेळीं नॅन्सीनेंहि नवऱ्यास अभिमानानें सांगितलें, “ तुम्हांला धाक पडला होता नाहीं पोराचें काय होणार म्हणून ? गांवांतील लोक तर याला मठ्ठ म्हणत होतें; पण आतां पहाना माझा अल्. ”

नॅन्सीचें हें म्हणणें सॅम्युअल कोणत्या तोंडानें नाकारणार ?

होतां होतां आईच्याच साह्यानें थॉमसनें विद्युत्‌शास्त्र, रसायनशास्त्र, भौतिकशास्त्र इत्यादि विषयांवरीलहि पुस्तकें वाचून काढलीं. त्या पुस्तकांतून दिलेलीं प्रयोगवर्णनांची छाप थॉमसच्या मनावर फारच पडली. आपणाहि असेच प्रयोग करावेत असें त्याच्या बाल मनानें घेतलें आणि त्यानें नाना तऱ्हेचीं रसायनें जमविलीं; निरनिराळी उपकरणी पैदा केली. आपल्या घरांतच त्यानें प्रयोगशाळा सिद्ध केली. शेंदोनशें बाटल्या त्याच्या शेल्फवर व्यवस्थित रीतीनें मांडलेल्या दिसूं लागल्या. नॅन्सीकडून जे खाऊसाठीं पैसे येत त्यांच्या साह्यानें तो रासायनिक द्रव्यें विकत आणी. दहा वर्षांच्या पोराचे हे उपद्व्याप पाहून नॅन्सीस कधीकधीं धाक वाटे. हवेंत उडण्यासंबंधींचें प्रयोग त्यानें वाचले होते. त्याचें प्रत्यंतर पाहण्यासाठीं त्यानें आपल्या घरांतील नोकर मायकेल् ओट्स यास पुष्कळशी सीडलिट्झ

पावडर खाण्यास दिली. आतां मायकेल्च्या पोटांत वायु निर्माण होईल आणि तो हवेंत उडूं लागेल अशी थॉमसची कल्पना! पण झालें भलतेंच. पोटांत विलक्षण कळा निर्माण होऊन तो बिचारा गडबडा लोळू मात्र लागला. शेवटी कांहीं उपचार करून त्याचा जीव बचावला.

असले उद्योग थॉमसचे वाढल्यामुळें नॅन्सीला मोठाच पेंच निर्माण झाला. त्याची वाढती प्रयोगशाळा पाहून आणि तिच्यांतील धोका ओळखून एकदां ती रागावली सुद्धां. "अल्, पुरे झाली ही तुझी प्रयोगशाळा. आतां नाही आणावयाचें काहीं. नाही तर देईन सारी फेकून रस्त्यावर" कधी न रागावणाऱ्या आईचे हे शब्द ऐकून थॉमस गोरामोरा झाला. त्याच्या डोळ्यांत पाणी जमा झालें. बिचाऱ्या 'अल्' ची ही अवस्था पाहून नॅन्सीलाहि कळवळून आलें. शेवटी तिनें बजावलें, "अल्. ही सारी अडगळ तळघरात नेऊन ठेव आणि बाहेर जातांना कुलूप लावून जात जा." हा करार 'अल्' ला पसत पडला.

परंतु आतां त्याच्या प्रयोगांना वाढता पैसा लागूं लागला. घरची परिस्थिति तो जाणून होता. एकदां त्यानें आईजवळ गोष्ट काढली,

"आई, मी नोकरी करूं का? तुलाहि मदत होईल आणि मलाहि प्रयोगाचे सामान घेण्यास पैसे मिळतील."

कोंवळ्या वयांत पोरानें नोकरी करावी ही कल्पना नॅन्सीला कशीतरीच वाटली. पहिल्यानें तिनें त्याला परवानगी दिली नाही. पण पुढें थॉमसनें फारच आग्रह धरला तेव्हां त्याला परवानगी मिळाली! त्याचें वय अवघें बारा वर्षांचें होतें. पोर्ट ह्युरानपासून डेट्राइटपर्यंत म्हणजे सुमारे १२५ मैलांच्या प्रवासांत ग्रँट ट्रंक रेल्वेमध्यें फळफळावळ विकण्याची नोकरी त्यानें मिळविली. भाजीपाल्याचेंहि दुकान त्यानें उघडलें. पण येवढ्यावर तो कुठला थांबणार? वर्तमानपत्रें विकण्याचाहि परवाना त्यानें मिळविला. हा त्याचा वाढणारा उद्योग पाहून नॅन्सीच्या पोटांत धस्स होई. पोरगा कोठें फसला, अडला तर सारीच पंचाईत होईल असें तिला राहूनराहून वाटे. पण थॉमसबद्दलचा तिचा अभिमान दुणावत होता. छोटा थॉमस व्यवहारांत अत्यंत दक्ष होता. मिळकतीपैकी रोज एक डॉलर थॉमस

आपल्या आईच्या स्वाधीन करी. छोट्या लेकानें कोंवळया वयांत केलेली ही कमाई पाहून नॅन्सीला खूपच आनंद वाटे. थॉमसच्या वडिलांना खगोल शास्त्राचा थोडा नाद होता. घरी लांकडाचाच धंदा असल्यामुळें त्यानें घराशेजारीं ऐंशी फूट उंचीचा एक टॉवर बांधला होता. त्यावर त्यानें एक टेलिस्कोप बसविला होता. थॉमस व त्याची आई हे दोघे या टॉवरवर बसून दररोज दुर्बिणीतून भोंवतालच्या प्रदेशांचें निरीक्षण करीत असत.

थॉमसच्या पुढील सर्व जीवनावर त्याच्या आईच्या शिकवणुकीचा प्रभाव पडलेला दिसतो. "प्रत्येक गोष्ट शभर टक्के यशस्वी कर." अशी त्याच्या आईची शिकवण होती. त्याप्रमाणें थॉमस एडिसननें आपली प्रगति चालू ठेविली. वयाच्या पधराव्या वर्षी एडिसननें एक स्वतःचें वर्तमानपत्र काढलें. संपादकीय कचेरी, छापखाना इत्यादि सर्व विभाग त्याच्या त्या रेल्वेच्या छोट्या डब्यांतच होतें. 'साप्ताहिक हेराल्ड' असें त्याच्या वर्तमानपत्राचें नांव होतें. "प्रकाशक : थॉमस ए. एडिसन, किमत महिन्यास ८ सेंटस" अशी वर्तमानपत्रावरील अक्षरें पाहून नॅन्सीला अस्मान ठेंगणें झालें. तिनें आपल्या लाडक्या लेकाचा पहिला अंक दोनहि बाजूंनी काचा असलेल्या तावदानांत नीट रीतीनें बसवून घेतला; आणि येणाऱ्या जाणाऱ्या लोकांना थॉमसचें कौतुक वर्णन करून सांगणें हाच एक तिचा उद्योग बनला.

पुढें पुढें थॉमसच्या आयुष्यांत निरनिराळी वळणें लागत गेली. त्याच्या डब्यांत स्फोट झाल्यानें गार्डनें त्याला चांगलेंच मारलें. झिणझिण्या येई-पर्यंत त्याच्या कानशिलावर वार बसल्याचें पाहून नॅन्सी तर अधिकच व्याकूळ झाली. थॉमसला ती नोकरी सोडून द्यावी लागली. थॉमसच्या या उपद्-व्यापी स्वभावाची तिलाहि मोठी काळजीच वाटूं लागली. फॉस्फरस वगैरे ज्वालाग्राही पदार्थ घरांत ठेवावयाचे नाहींत अशी ताकीदहि तिनें सौम्य शब्दांत त्याला दिली. 'वीक्ली हेराल्ड' आतां घरच्या घरीच निघूं लागला. गांवांतील प्रतिष्ठित परंतु शिष्ट माणसांची बिंगें थॉमस खरमरीत टीका करून बाहेर आणीत असे. एकदां एका माणसावर त्यानें अशीच कडक टीका केली म्हणून त्या माणसानें थॉमसला सेंट क्लेअरनदींत फेंकून दिलें! त्यानें कसाबसा आपला जीव बचावून घेतला. आईला ही बातमी समजलीच.

आतां मात्र या पोरास काय काय करावें हें तिला समजेना. थॉमसच्या सद्‌गुणांबरोबर त्याचे हे उपद्व्यापहि तिला तापदायक होऊं लागले. परंतु पुढें थॉमसला रेल्वेंत तार ऑफिसमध्यें नोकरी लागल्यामुळें त्याचे इतर नसते धंदे बंद पडले आणि नॅन्सीची चिन्ता दूर झाली.

आतां थॉमसच्या जीविताला एक प्रकारचें वळण लागण्यास प्रारंभ झालेला होता. आपल्या मातेपासून तिच्या मुखचर्येवरील गांभीर्य त्यानें उचललें आणि याच गांभीर्यातून त्यानें आपल्या पुढील आयुष्यांत अखिल मानव-जातीस उपयोगी पडतील असे अनेक शास्त्रीय शोध लावले; आणि शास्त्र-ज्ञांचा मुकुटमणि म्हणून थॉमसचा सर्व जगांत लौकिक झाला !

परंतु हें भाग्य त्याच्या आईस पहाण्यास मिळालें नाहीं. १८७१ च्या ९ एप्रिल रोजीं नॅन्सीचें निधन झालें. थॉमसचें वय अवघें चोवीस वर्षांचें होतें. लहानपणापासून सहकारी म्हणून वागलेली आई गेल्याबरोबर थॉमस एकदम गंभीर झाला. त्याच्या प्रगतीस नुकतीच सुरुवात झालेली होती. पण ती त्याला आतां आईची आठवण काढीत एकट्यानेंच करावयाची होती. थॉमसनें आपल्या आईस मोठाच मान दिला होता.

त्यानें आईसंबंधीं पुढील उद्‌गार काढले आहेत;

“ माझ्या मातुःश्रीचा सहवास मला जरी दीर्घकाल लाभला नाहीं तरी तिच्या प्रेमळ व वात्सल्यमय सहवासाचा मला जो कांहीं थोडासा अनुभव आला, त्याचाच माझ्या आयुष्यावर विलक्षण परिणाम झालेला आहे. तिच्या अकृत्रिम प्रेमळपणाचा आणि सुसंगतीचा जर मला फायदा मिळाला नसता तर माझ्या कल्पक बुद्धीचा विकास खात्रीनें झाला नसता. नोव्हास्कोशिया येथें माझी आई अध्यापिका होती व त्यामुळें मुलांच्या मानसिक परिस्थि-तीची किंवा त्यांच्या तरल मनोविकारांची जाणीव सहाजिकच तिला पूर्णपणें असे. उनाड, उच्छृंखल व दुर्वृत्त तरुणांना त्यांच्या लहानपणींच जर चांगलें शिक्षण मिळालें तर तीं मुलें चांगलींच निपजतील असा तिचा विश्वास होता. तिच्या या अनुभवाचा आणि प्रेमळ वृत्तीचा फायदा मला मिळाल्यावांचून राहिला नाहीं.”

---